


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

वर्ष २५ वें, अंक १०६ ] [ जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९५३

# १०६

## अ नु क्र म णि का








## या अंकांतील लेखक

**श्री. मनोहर सरपटवार :** बी. ए. वणी (वऱ्हाड), म. सा. पत्रिका अंक १०३ पहा.

**श्री. वसंत वऱ्हाडपांडे :** एम्. ए. नागपूर. कवि व लघुकथालेखक. लेखन निरनिराळ्या मासिकांतून विखुरलेलें.

**सौ. उषा पोतदार :** एम्. ए. पुणें. पीएच्. डी. साठी अर्थविज्ञानावर डॉ. तुळपुळे यांच्या मार्गदर्शनाखाली प्रबंध लिहीत आहेत.

**डॉ. शं. गो. तुळपुळे :** एम्. ए., पीएच्.डी. पुणें. म. सा. पत्रिका अंक १०२ पहा.

**श्री. राजा मंगळवेढेकर :** दौंड. कवि. स्फुट लेखन.

**प्रा. सुरेश म. डोळके :** एम्. ए. विदर्भ महाविद्यालय, अमरावती. म. सा. पत्रिका अंक १०२ पहा.

**हरिवास व सोंगोवास :** या अंकाच्या २५ व्या पानावरील आरंभीची टीप पहा.

**श्री वि. स. खांडेकर :** कोल्हापूर. म. सा. पत्रिका अंक १०४ पहा.

**प्रा. अरविंद मंगरूळकर :** एम्. ए. पुणें. सर परशुरामभाऊ कॉलेजमध्ये संस्कृत विषयाचे प्राध्यापक. कवि व टीकाकार.

**श्री. दा. न. शिखरे :** पुणें. संपादक, महात्मा; म. गांधी चरित्र, राष्ट्रजनक टिळक, सर्वश्रेष्ठ हिंदुधर्म इत्यादि ग्रंथांचे लेखक.

**श्री. ना. के. बेहेरे :** एम्. ए., बी.एस्सी. नागपूर. कवि, कादंबरीकार व टीकाकार. ग्रंथ : सीतावनवास; ध्येयाकडे; बोथट बाण; १८५७; पहिले बाजीराव; मोत्यांची माळ इत्यादि.

**डॉ. के. ना. वाटवे :** एम्. ए., पीएच्.डी. पुणें. म. सा. पत्रिका अंक १०२ पहा.

**प्रा. म. ना. अद्वंत :** एम्. ए. जळगाव (पूर्व खानदेश). म. सा. पत्रिका अंक १०२ पहा.

**डॉ. सरोजिनी बाबर :** एम्. ए., पीएच्.डी. पुणें. म. सा. पत्रिका अंक १०२ पहा.

---

मुद्रक :—म. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, लि०, १९८/१७, सदाशिव, पुणें २.
प्रकाशकः—अ. गं. मंगरूळकर, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

महाराष्ट्र–साहित्य–परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

वर्ष २५-वें, अंक १०६ ]  [ जुलै–ऑगस्ट–सप्टेंबर १९५३

## १०६

### ओला श्रावण हिरवी वसुधा—

ओला श्रावण हिरवी वसुधा
आर्द्र अंतरीं गूंजे हिरवीं
ग्रीष्मामधल्या व्यथा साहुनी
कथा धरेची सुखकर व्हावी !

नवीन आशा जगावयाची
पर्णोपर्णातून फुलतसे
श्रावणाचिया आश्लेषानें
कधींच विरले तीव्र उसासे ।

कुजबुज करितो खट्याळ वारा
वसुंधरेच्या कानांलागुन
पाकळींतुनी गंध उडाला
थरथरला क्षण मनीं बावरुन !

आला भिजवित ओला श्रावण
स्वप्न पूर्ण हो आणि धरेचें
स्वप्नगीत नव मनीं उमलुनी
तेज मुखावर साफल्याचें !!

— म. ना. सरपटवार.

अनुक्रमणिका



# महाराष्ट्र–साहित्य–संमेलन

## अधिवेशन ३६ वें, अहमदाबाद ( १९५३ )

### निमंत्रण

महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें ३६ वें अधिवेशन अहमदाबाद येथें ३१ आक्टोबर व १ व २ नोव्हेंबर ५३ रोजीं श्री. वि. द. घाटे यांच्या अध्यक्षते-खाली भरणार आहे. संमेलनाचें उद्‌घाटन नामदार दादासाहेब मावळंकर, अध्यक्ष, भारत लोकसभा, यांचे हस्ते होणार आहे.

संमेलनास जोडून 'संतवाङ्मय' या विभागाचे शाखासंमेलन होणार आहे.

याशिवाय बोलपटांतील कथावाङ्मय ह्या विषयावर चर्चा होणार असून व्याख्यान, काव्यगायन इत्यादि कार्यक्रम होणार आहेत.

यंदा भाषाभगिनी हा अभिनव उपक्रम योजण्यांत आला आहे.

प्रतिनिधी वर्गणी रु. ३।– असून येथील निवास व भोजनखर्च रु. १०।– येईल.

तरी परिषदेच्या सर्व सभासदांनी संमेलनास अगत्य उपस्थित रहावे अशी विनंती आहे.

कार्यालयः—
भद्र, अहमदाबाद.
दि. २७–९–५३.

मो. श्री. पंडीत.
गो. के. नागराज.
प्र. मा. जांभेकर.
कार्यवाह

अनुक्रमणिका






## डोंगराच्या आड —

डोंगराच्या आड माझ्या जन्मदेचें गांव आहे
तेथ या वेड्या मनाची ही कधींची धाव आहे !
कंटकांनी व्यापिलेला नागमोडी मार्ग आहे
मात्र तेथे शेवटीं या भूवरीचा स्वर्ग आहे !
वाट आहे जीवघेणी लांब लाख क्रोश आहे
जीवजंतूंचा सभोंतीं चालला आक्रोश आहे.
आसमंतीं कोंदलेला वासनांचा दर्प आहे
दंश घ्यायाला विषारी दक्ष काळा सर्प आहे
वृक्ष आहे दों कडांना–सर्वही निष्पर्ण आहे
मात्र एखादें परंतू पान कोठे जीर्ण आहे.
क्षीण हा मार्गांत कोठे जीवनाचा पाट आहे
अन् तृषार्तांची कडेला भीड मोठी दाट आहे.
डोंगराच्या आड माझें एकलें श्रद्धेय आहे
अंतरींची तीव्र आशा हें सर्व पाथेय आहे !

जन्मदेचें गांव : ज्याला कांचनाचा कोट आहे
खंदकांतूनी तयाच्या जीवनाचा पाट आहे.
देउळें प्रेमें नभाला देत जेथे साद आहे
व्यापुनी साऱ्या अणूंना गोड घंटानाद आहे.
रेखलेला मार्ग त्याच्या दों कडांना वृक्ष आहे
आसरा विश्वास द्याया जे कधींचे दक्ष आहे.
पांखरांची मुक्त वाणी हा ऋषींचा साम आहे
प्रेम द्यावें प्रेम घ्यावें हा जनांचा काम आहे.
पद्मिनीशीं निष्ठ जेथे स्वैरगामी भृंग आहे
अंतरंगीं भक्तवेडा जागता श्रीरंग आहे.
पारिजाताच्या सुगंधें जेथ सारें धुंद आहे
दैन्य नाही दुःख नाही; एक तो आनंद आहे.
रत्नदारीं रेखलेलें तारकांनी नांव आहे–
तेथ या वेड्या मनाची ही कधींची धाव आहे !

— वसंत वऱ्हाडपांडे.

---

अनुक्रमणिका

# अर्थविज्ञान आणि मराठी भाषा

## लेखांक १

उषा पोतदार (घाटे) व शं. गो. तुळपुळे
( मराठी विभाग, पुणें विद्यापीठ. )

### प्रास्ताविक —

अर्थविज्ञान म्हणजे भाषेचें शब्दार्थशास्त्र. हें शास्त्र इंग्रजींत ' सेमॅंटिक्स ' या नांवानें ओळखलें जातें. अर्थविज्ञान हें भाषाशास्त्राचेंच एक अंग असून तें भाषेच्या बाह्यांगाचा विचार न करतां तिच्या अंतरंगाचा ठाव घेतें. कोणत्याहि भाषेतील शब्द हे जरी कानांवर ध्वनिरूपानें पडत असले तरी त्यांचा मनास जो बोध होतो तो अर्थरूपानेंच होतो. शब्द कानांवर पडतो आणि त्याचा अर्थ मनांत उतरतो. अर्थात्, ध्वनि हें जें भाषेचें कवच तें तुलनेनें शरीर व स्थूल असून अर्थ हा जो भाषेचा गाभा तो मानसिक व सूक्ष्म आहे असें म्हणावें लागेल. प्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ येस्पर्सन्[1] यानें भाषाविषयक अभ्यासाचा आढावा घेतांना चक्षुनिष्ठ भाषाशास्त्र व श्रुतिनिष्ठ भाषाशास्त्र असा एक भेद केला आहे. त्याचें म्हणणें असें, की भाषा ही मुळांत बोलली व ऐकली जाते, ती लिहिण्यासाठी व वाचण्यासाठी नाही, या तत्त्वाचा विसर पडल्यामुळे अनेक वर्षेंपर्यंत भाषाशास्त्र केवळ चक्षुनिष्ठ राहिलें व पुढे कालांतरानें भाषेच्या यथार्थ-स्वरूपाचें आकलन झाल्यावर तें श्रुतिनिष्ठ झालें. चक्षुनिष्ठ भाषा-शास्त्राचा (eye-philology) वरचष्मा श्रुतिनिष्ठ भाषाशास्त्रास (ear-philology) अनेक वर्षें सहन करावा लागला ही येस्पर्सनची तक्रार बरोबरच आहे. पण अर्थास जर भाषेचें मानसिक अंग म्हटलें तर या अंगाकडे अभ्यासकांचें अजूनहि दुर्लक्षच होत आहे अशीहि तक्रार रास्तच करतां येईल. भाषा ही जशी मूलत: लिहिण्यावाचण्यासाठी नसून बोलण्याऐकण्यासाठी आहे, तद्वतच भाषानिर्मितीचा आद्य हेतु ध्वन्युत्पादन हा नसून विचारप्रकटीकरण असा आहे हेंहि ध्यानांत घेतलें पाहिजे. ध्वनि हें विचारप्रकटीकरणाचें एक साधन आहे, इतकेंच. ज्ञानी पुरुषाचें मौन हेंहि व्याख्यानरूप असूं शकतें या प्रसिद्ध वचनांतील अभिप्राय कांही अंशीं असाच आहे. तात्पर्य, ध्वनीचें कार्य अर्थनिर्मिति हें असल्यामुळे शेवटीं ध्वनि हा गौण ठरून अर्थासच प्राधान्य मिळतें व तें तसें मिळावें यांत अनुचित असें कांही नाही.

### अर्थविज्ञान म्हणजे काय ?

वर म्हटलेंच आहे की, या शास्त्रास इंग्रजींत सेमॅंटिक्स असें म्हणतात. क्वचित् ' सेमॅ-टॉलॉजी ' किंवा ' सेमॅसियॉलजी ' असेंहि म्हटलें जातें. परंतु रूढ इंग्रजी शब्द सेमॅंटिक्स असा असून तो ' मॅथेमॅटिक्स ' या शब्दाप्रमाणे नेहमी अनेकवचनी वापरांत असला तरी त्याचा अर्थ मात्र एकवचनीच आहे. Semantics हा शब्द Phonetics या ध्वनिशास्त्रार्थक शब्दाशीं विरोध दर्शवितो. हा शब्द ज्या मूळ फ्रेंच शब्दावरून आला तो Semantique असा असून तो या शास्त्राचा उद्गाता ब्राएल ( Breal ) यानें प्रथम वापरला. ग्रीक भाषेंत

1. Language, p. 24.

Semainein या धातूचा अर्थ ' दर्शविणें ' किंवा ' अर्थ करणें ' असा असून या धातूपासून Semantikos असें विशेषण ग्रीक भाषेंत सिद्ध होतें व तेंच Sema..tics या इंग्रजी व Semantique या फ्रेंच शब्दाचें मूळ होय. त्याची परंपरा अशी—

ग्री. Semainein = दर्शविणें.
> ग्री. Semantikos = वाचक, द्योतक.
> फ्रें. Semantique = अर्थविज्ञान.
> इं. Semantics = अर्थविज्ञान.

या शब्दाचा धात्वर्थ ध्यानीं घेतां मराठींत या शास्त्रास शब्दार्थशास्त्र किंवा नुसतें अर्थशास्त्र असें म्हणण्याचा मोह होतो, हें खरें. परंतु अर्थशास्त्र या शब्दास मराठींत आधीच एक विशिष्ट अर्थ प्राप्त झालेला असल्याने तो शब्द पुनः शब्दार्थशास्त्र या अर्थीं वापरणें म्हणजे संदिग्धतेंत भर घालणेंच होय. शिवाय भाषाशास्त्र हें शास्त्र या पदवीस जितपत पात्र किंवा अपात्र आहे तितपतच शब्दार्थशास्त्र हेंहि आहे. किंबहुना त्यास शास्त्र ही पदवी शोभून दिसेल किंवा न ही याचीहि शंकाच वाटते. कारण शास्त्र म्हटलें, की त्यांतील सर्व घटना निरपवाद, निदान नियमबद्ध असणें अवश्य आहे. भाषाशास्त्र हें निरपवाद तर नाहीच, उलट त्यांत अपवादच फार असून त्याचे नियम पाळले जाण्यापेक्षा मोडलेच अधिक जातात असें कांहींचें म्हणणें आहे. तेव्हा याहि दृष्टीने विचार करतां सेमॅंटिक्स या इंग्रजी शब्दाचें भाषांतर अर्थशास्त्र किंवा शब्दार्थशास्त्र असें न करतां मराठींत त्यास ' अर्थविज्ञान ' म्हणणें अधिक बरें असें आम्हांस वाटतें. भाषेंतील शब्दांचे अर्थ कां व कसे बदलतात हा अर्थविज्ञानाचा विषय असून शब्दांच्या अर्थामध्ये घडून येणारे हे बदल कांही नियमानुसार घडून येतात किंवा केवळ योगायोगाने व अकारण घडतात या प्रश्नाची मीमांसाहि अर्थविज्ञानाच्या कक्षेंत येते.

## अर्थविज्ञानाचें माहात्म्य—

भाषाविषयक अभ्यासाचीं, उच्चारप्रक्रिया (phonology), प्रत्ययप्रक्रिया (morphology), व व्युत्पत्ति (etymology) अशीं तीन अंगें असून तीं आपापल्या परीने महत्वाचींच आहेत. परंतु हीं अंगें भाषेचा विचार केवळ बाह्यदृष्टीने करीत असल्यामुळे भाषेच्या अंतरंगांत शिरू पाहणारें अर्थविज्ञान हें तुलनेने अधिक महत्त्वाचें म्हटलें पाहिजे. शब्दाचा उच्चार आणि त्या शब्दास प्रत्यय लागून बनणारीं त्याचीं विविध रूपें अभ्यसनीय असलीं तरी या अभ्यासाने त्या शब्दाचें अंतरंग, किंबहुना त्याचा केवळ आत्माच असा जो अर्थ त्याची संपूर्ण कल्पना येणार नाही. ती येण्यासाठी त्या शब्दाची अर्थप्रक्रिया तपासली पाहिजे. ध्वनि हा अर्थाचें वाहन असल्याने ध्वनिप्रक्रियेस भाषेचें शरीरशास्त्र मानलें तर अर्थप्रक्रियेस भाषेचें मानसशास्त्र म्हटलें पाहिजे. शरीरव्यापारापेक्षा मनोव्यापार हे अधिक सूक्ष्म, गुंतागुंतीचे व महत्त्वाचे असतात हें आपणांस ठाऊकच आहे. एक उदाहरण घेऊन बोलावयाचें तर—

| | | |
|---|---|---|
| हृदय ( सं. ) | Cordis ( ग्रीक ) | Kardia ( ग्री. ) |
| > हिअअ ( प्रा. व अप. ) | > Cordialis ( लॅटिन् ) | > Cordis ( लॅ. ) |
| > हियें ( ज्ञानेश्वरी, ९–३५ ) | > Cordial ( इं. ) | > Heorte ( प्रा. इं. ) |
| > हिय्या ( अ. मराठी ) | | > Heart ( इं. ) |
| | | > Hearty ( इं. ) |

अनुक्रमणिका

ही उच्चारप्रक्रिया समजल्याने 'हृदय' या शब्दाचें बाह्यांग कसें बदलत गेलें एवढेंच फार तर कळेल. परंतु या बाह्य स्थित्यंतराबरोबर मूळ शब्दाच्या अर्थातहि बदल कसा घडून आला याची कल्पना केवळ उच्चारप्रक्रियेच्या अभ्यासाने येणार नाही. त्यासाठी अर्थविज्ञानाची कास धरून हृदय, हिअअ, हियें व हिय्या या भिन्नभिन्न काळीं रूढ असणाऱ्या शब्दांचे अर्थ अनुक्रमें अंतःकरण, भाव, गाभा, व धाडस अशा क्रमाने कसे बदलत गेले तें पाहावें लागेल तुलनेने संस्कृतांतील 'हृदय' या शब्दाशीं संबद्ध असणाऱ्या ग्रीकमधील Cordis किंवा Kardia या शब्दाचें रूपान्तर व अर्थान्तर होऊन तो इंग्रजीमध्ये Cordial किंवा Hearty म्हणजे अंतःकरणपूर्वक किंवा जिव्हाळ्याचें या नवीन अर्थाने कसा रूढ झाला याचीहि दखल घ्यावी लागेल. शेवटीं ज्यांचें मूळ एक आहे असे हे दोन शब्द ( सं. हृदय; ग्री. Cordis ) काळाच्या ओघांत अर्थदृष्ट्या कसे बदलत गेले याचा तौलनिक इतिहास पाहून त्यावरून कांही सर्वसामान्य असा निष्कर्ष निघूं शकतो किंवा काय तेंहि पहावें लागेल. तात्पर्य, शब्दांच्या अर्थातील उत्क्रांति, त्यांच्या सातत्याची, अवनतीची, विनाशाची व पुनरुज्जीवनाची मीमांसा, आणि नवनवीन शब्दांच्या निर्मितीचीं कारणें हीं सर्व अर्थविज्ञानाच्या कक्षेमध्ये येतील. भाषेच्या टांकसाळींत नव्याने घडविलेल्या शब्दांचीं नाणीं सोडलीं तर फारच थोडे शब्द असे राहतात की जे आपल्या मूलार्थास चिकटून आहेत. बदलणें हा जसा भाषेचा, तसा अर्थाचाहि स्वभाव आहे. कित्येकदा शब्दांचे अर्थ इतके बदलून जातात, की त्यांचे मूलार्थ शोधून काढण्यासाठी मोठेंच संशोधन करावें लागतें. शब्दार्थाची निर्मिति व त्यांचा विकास यांचा संबंध मानवी मनाशीं असून शब्दाच्या बाह्यांगाचा विकास हा एकप्रकारें मानवी शरीराशीं संबद्ध आहे. या मूलभूत भेदामुळे अर्थप्रक्रियेस उच्चारप्रक्रियेप्रमाणे कांही विशिष्ट नियमांच्या चौकटींत बसविणें अशक्यप्राय होतें. अर्थविज्ञानाचा संबंध मुख्यतः मानसशास्त्राशीं असल्याने त्याचें स्वरूप कांहींसें लवचिक राहणार, हें उघड आहे. तसेंच, एखाद्या शब्दाचें रूप त्याच्या मूळापर्यंत ऐतिहासिक दृष्टीने पाहत गेल्यावांचून जसें त्या शब्दाचें सम्यग्दर्शन घडूं शकणार नाही, त्याप्रमाणेच त्या शब्दाचा इतिहास अर्थदृष्ट्या पाहिल्यावांचून अभ्यासास पूर्णता येणार नाही व त्या शब्दाचा इतिहासहि पूर्णपणें कळणार नाही. अर्थात्, भाषेचा अभ्यास हा नेहमी ध्वनि व अर्थ अशा दोन्ही अंगांनी करावा लागतो. कित्येकदा अभ्यासाचीं हीं दोन अंगें परस्परावलंबी आहेत असा अनुभव येतो, तर कधी तीं सर्वस्वीं स्वतंत्र असल्याचें दिसतें. वर 'हृदय' या शब्दाची जी प्रक्रिया पाहिली ती उभयविध व परस्परावलंबी अशी आहे. उलट, संस्कृतांतील 'गुरु' हा शब्द मराठींत उच्चारदृष्ट्या अविकृत राहून अर्थदृष्ट्या मात्र त्यांत विविध छटा निर्माण झाल्यामुळे तो दुसऱ्या प्रकारांत मोडेल. वरील विवेचनाचा निष्कर्ष हा, की कोणत्याहि शब्दाचा संपूर्ण इतिहास त्याच्या अंतर्बाह्य परीक्षेनेच कळून येईल. याहि दृष्टीने पाहतां अर्थविज्ञान महत्त्वाचें ठरतें. कारण त्यावांचून शब्देतिहास अपूर्ण राहण्याची भीति असते.

### पाश्चात्यांचें अर्थविज्ञान —

ऐतिहासिक भूमिकेवर उभारलेलें भाषाशास्त्र युरपमध्ये १९ व्या शतकाच्या प्रारंभीं जन्मलें खरें; परंतु अर्थविज्ञान हें त्याचें अंग आणखी कांही वर्षें दुर्लक्षितच राहिलें. शब्दाचे अर्थ कां व कसे बदलतात या प्रश्नाचा थोडाफार विचार यापूर्वी ग्रुगमान व व्हिटने या दोघां भाषापंडितांनी केलेला असला तरी या विषयाची विस्ताराने चर्चा करणारा पहिला भाषाशास्त्रज्ञ हर्मान पॉल हा होय. इ. स. १८८० मध्ये प्रथम प्रसिद्ध झालेल्या त्याच्या 'भाषेच्या

इतिहासाचीं तत्वें ' ( Prinzipien der Sprachgeschichte )[1] या ग्रंथांत अर्थविज्ञानास कांही स्वतंत्र प्रकरणें दिलेलीं आढळतात. हर्मान पॉलने केलेलें अर्थप्रक्रियेचें वर्गीकरण निर्दोष नसलें तरी अभ्यासकांच्या मनांत तें असें कांही बसून गेलें की अजूनहि अनेक ग्रंथकार त्याने घालून दिलेली चौकट अर्थप्रक्रिया विवेचितांना वापरतात. अर्थविज्ञानाचीं मूलभूत तत्वें जाणून घेण्याच्या दृष्टीने पॉलचें विवेचन उपयुक्त आहे यांत शंका नाही. या क्षेत्रांतील दुसरा नांव घेण्यासारखा प्रयत्न लंडन विद्यापीठांतील तौलनिक भाषाशास्त्राचे प्राध्यापक जी. पी. पोस्टगेट यांनी इ. स. १८९६ मध्ये दिलेल्या एका व्याख्यानाच्या रूपाने केलेला आढळतो.[2] अर्थ-विज्ञानावरील हें व्याख्यान जसें मार्मिक तसेंच मोठें उद्बोधकहि आहे. शब्दार्थशास्त्राची जी उपेक्षा होत गेली त्याबद्दल खेद व्यक्त करून प्रा. पोस्टगेट यांनी अभ्यासकाने प्रारंभ कोठे व कसा करावा याविषयी कांही बहुमोल सूचना आपल्या व्याख्यानांत केल्या आहेत. हें व्याख्यान त्यांनी दिलें तेव्हा ' सेमॅंटिक्स ' हा शब्द इंग्रजी भाषेंत रूढ झालेला नसल्याने या शास्त्रास म्हणावें तरी काय असा प्रश्न त्यांच्यापुढे पडला व त्यांनी ' Rhematology ' हें नांव शब्दार्थशास्त्रास सुचविलें. याच्या पुढल्याच वर्षी, म्हणजे इ. स. १८९७ मध्ये फ्रेंच भाषा-शास्त्रज्ञ मायकेल ब्राएल (Michel Breal) यांचा Essai de Semantique [3]हा ग्रंथ प्रसिद्ध झाला व तेव्हापासून अर्थविज्ञानास Semantique किंवा Semantics हा शब्द रूढ होऊन प्रा. पोस्टगेट यांनी सुचविलेला शब्द मागे पडला. ब्राएल यांचा उपर्युक्त ग्रंथ म्हणजे अर्थ-विज्ञानाचा पायाच होय असें म्हणण्यांत अतिशयोक्ति नाही. अर्थप्रक्रियेच्या मुळाशीं कांही तात्विक सिद्धान्त आहेत व त्यांना धरूनच शब्दांचे अर्थ बदलत जातात असा ब्राएल यांच्या एकंदर विवेचनाचा रोख आहे. साम्यतत्व आणि रूपक ( Analogy and Metaphor ) हीं दोन कारणें अर्थप्रक्रियेच्या बाबतींत किती प्रभावी असतात तें दाखवून ही प्रक्रिया मूलतः मानसिक असल्याने अर्थविज्ञानाचा अभ्यास मानसशास्त्रासहि कसा पोषक होईल तें ब्राएल यांनी दाखवून दिलें आहे. तसेंच, भाषा हें विचारप्रकटीकरणाचें एकमेव साधन अपुरें पडल्यामुळे तत्वज्ञानाच्या क्षेत्रांत जे वाद माजतात व शास्त्राची जी हानि होते ती अर्थ-विज्ञानाच्या अभ्यासाने कांही अंशीं तरी कमी होईल असेंहि या ग्रंथकाराचें म्हणणें आहे. अर्थप्रक्रियेच्या अभ्यासाने कांही रूढ व्याकरणविषयक सिद्धान्तांचाहि पुनर्विचार करावा लागेल हें तर ब्राएल यांनी आरंभींच सांगितलें आहे. सारांश, ब्राएल यांचा हा ग्रंथ पुढिलांस मार्ग-दर्शक होणारा असून त्यांतील सिद्धान्तांच्या व वर्गीकरणपद्धतीच्या आधारेंच बहुतेक सर्वांनी या विषयाची चर्चा केलेली आढळते. अशा ग्रंथकारांत येस्पर्सन्, ब्लूमफील्ड, वेंद्रे, स्टर्टवंट, लुई ग्रे, वगैरे लेखक प्रामुख्याने येतात. ब्राएल यांच्या ग्रंथाचें जसें स्वागत झालें, तशीच त्यांतील विचारपद्धतीवर टीकाहि झाली. अशा टीकाकारांत ऑगडेन् व रिचर्डस् हे प्रमुख होत. ते आपल्या ग्रंथांत म्हणतात,[4] "Although M. Breal's researches drew attention to a number of fascinating phenomena in the history of language and awakened a fresh interest in the educational possibilities of etymology, the net

१ इंग्रजी अनुवाद : ' Principles of the History of Language '
—by H. A. Strong ( Longmans, 1891 )

२. The Science of Meaning ( Fortnightly Review, Sept. 1897 ).

३. इंग्रजी अनुवादः Semantics (कस्टकृत; प्रका० हाएनमन, १९००).

४. Meaning of Meaning, p. 2.

result was disappointing. The use of words as though their meanings were fixed, the constant resort to loose metaphor, the hypostatization of leading terms, all indicate an unsuitable attitude in which to approach the question." ब्राएल यांच्या ग्रंथाची अंतिम फलश्रुति नैराश्यजनक ठरली या ऑगडेन् आणि रिचर्डस् यांच्या टीकेशीं आपण सहमत होऊं शकलों नाहीं तरी अर्थविज्ञानासारख्या विषयावर लिहितांना भाषा किती जपून वापरली पाहिजे ही त्यांची सूचना केव्हाहि स्वागतार्हच आहे. या कांहीशा गुंतागुंतीच्या विषयाचा अभ्यास करणें सुलभ व्हावें म्हणून सोयीच्या दृष्टीने अर्थप्रक्रियेच्या निरनिराळ्या प्रकारांचें एक स्थूल असें वर्गीकरण अनेक ग्रंथांतून केलेलें आढळतें. ही वर्गीकरणपद्धति मुख्यतः हर्मान पॉल व ब्राएल यांनी अंगिकारिलेल्या वर्गीकरणास अनुसरून आहे. परंतु या वर्गीकरणपद्धतीवर अगदी अलीकडे म्हणजे गेल्याच वर्षी प्रसिद्ध झालेल्या Three Keys to Language या आपल्या ग्रंथांत त्याचे लेखक रॉबर्ट एस्ट्रिच व हान्स स्पर्बर यांनी विदारक टीका केली आहे. त्यांचें म्हणणें असें, की अर्थप्रक्रियेचें हें वर्गीकरण स्वयंपूर्ण व अबाधित ( mutually exclusive ) नसल्यामुळे तें अशास्त्रीय, अतएव असमाधानकारक म्हटलें पाहिजे. या लेखकद्वयाचा दुसरा आक्षेप असा की, पॉल किंवा ब्राएल यांची ही वर्गीकरणपद्धति एकदा स्वीकारली म्हणजे अर्थप्रक्रियेचें एखादें विशिष्ट उदाहरण त्यासाठी आधीच तयार असलेल्या सदरांत टाकून त्यावर त्या विशिष्ट प्रकाराच्या नांवाची चिठ्ठी डकविली म्हणजे झालें, असा बहुसंख्य अभ्यासकांचा भ्रम होऊन बसण्याची फार भीति असते. अर्थप्रक्रियेच्या एखाद्या विशिष्ट उदाहरणास ' अर्थभ्रंश ', किंवा ' अतिशयोक्ति ' किंवा ' अर्थसंकोच ' यासारख्या सदरांत टाकून दिलें म्हणजे आपण त्याची विल्हे योग्य प्रकारें लावली हें समाधान खोटें आहे. हे लेखक आणखी पुढे जाऊन असें सुचवितात, की ही रूढ वर्गीकरणपद्धति स्वीकारली असतां अर्थप्रकिया ज्या मानासिक घटनांमुळे घडून येते त्यांचें महत्त्व बाजूला राहून विषयाच्या विवेचनास एक प्रकारचा ठोकळेबाजपणा येतो. अर्थविज्ञानांत मानसशास्त्रास प्राधान्य दिलें पाहिजे हें वरील लेखकद्वयाचें प्रतिपादन मान्य करूनहि त्यांच्या वर्गीकरणपद्धतीवरील टीकेशीं आपण पूर्णपणें सहमत होण्याचें कारण नाही. कारण, एक तर स्वतः ब्राएलनेहि अर्थप्रक्रिया ही एक मानासिक क्रिया असल्याचें मान्य केलेंच आहे. अर्थप्रक्रियेचें वर्गीकरण यांत्रिक पद्धतीने करावें असा आग्रह त्याने काय किंवा पॉलने काय कोठेंच धरलेला नाही. दुसरें असें, की अभ्यासाच्या सोयीसाठी म्हणून प्रारंभिक व स्थूल स्वरूपाचें का होईना, पण कांहि वर्गीकरण केल्यावांचून गत्यंतर नसतें. म्हणूनच ज्यांनी पॉल किंवा ब्राएल यांच्या वर्गीकरणपद्धतीवर टीका केली त्यांनीहि पुनः विवेचनाच्या सोयीसाठी तिचाच आश्रय केलेला दिसतो. तेव्हा एखादें विशिष्ट वर्गीकरण सदोष असलें म्हणजे अभ्यासाची ही पद्धतिच त्याज्य मानावी असें होत नाही. असो. पाश्चात्यांच्या अर्थविज्ञानाचा याहून अधिक तपशिलांत जाऊन परामर्श घेण्यास येथे सवड नाही. वरील विवेचनावरून एक गोष्ट स्पष्ट होते ती अशी, की ज्ञानाच्या या क्षेत्रांत फार गंभीर स्वरूपाचे असे मतभेद पाश्चात्य विद्वानांत नसून या विषयाबाबत बहुतेक सर्वांचें स्थूलमानाने एकमत आहे.

### पौर्वात्यांचें अर्थविज्ञान—

अर्थप्रक्रियेच्या अंगोपांगांचा अधिक विचार करण्यापूर्वी या विषयासंबंधींचें पौर्वात्यांचें तत्त्वज्ञानहि विचारांत घेणें जरूर आहे. या कामीं डॉ. प्रभातचंद्र चक्रवर्ती यांच्या Linguistic

एक उच्चारप्रक्रिया व दुसरें प्रत्ययप्रक्रिया. कोणी मराठींतील ध्वनींची ऐतिहासिक मीमांसा करूं पाहतात, तर कोणी नानाविध प्रत्यय लागून होणारी तिची शब्दसिद्धि विचारांत घेतात. ध्वनि हे जे शब्दाचे घटक त्यांचा किंवा प्रत्यय हे जे शब्दरूपांचे घटक त्यांचा अभ्यास मराठींत आजपर्यंत पुष्कळच झाला. व्युत्पत्तिविषयक व कोशविषयक प्रयत्नहि थोडेफार झाले. परंतु या सर्व अभ्यासांत शब्दाच्या बाह्यांगावर सर्वांचें लक्ष केंद्रित झालेलें होतें ही गोष्ट नाकारून चालणार नाही. अर्थ हा जो शब्दाचा गाभा किंवा त्याचें अंतरंग त्याकडे कोणाचेंच लक्ष विशेष गेलेलें दिसत नाही. नाही म्हणावयास डॉ. गुणे यांच्या 'तौलनिक भाषाशास्त्रा'— वरील ग्रंथांत व प्रा. कृ. पां. कुलकर्णीकृत 'मराठी' व 'शब्द' यांच्या 'उद्‌गम-विकासां' त अर्थप्रक्रियेची तोंडओळख करून देण्याचा ग्रंथकाराचा मानस दिसतो. परंतु ही केवळ तोंड-ओळखच आहे. तपशिलांत शिरणें या ग्रंथांच्या विषयमर्यादेबाहेरचें आहे. तात्पर्य, अर्थविज्ञान किंवा शब्दार्थशास्त्र हा विषय मराठीपुरतें बोलावयाचें झाल्यास अजूनहि अस्पृष्टच आहे असें म्हटलें पाहिजे. इतर भारतीय भाषांपैकीं कांहींनी मात्र या विषयाचा प्रपंच चांगला केलेला दिसतो. डॉ. बाबूराम सक्सेना यांचा 'अर्थविज्ञाना' वर एक स्वतंत्र ग्रंथ असून त्यांतील विवेचन मुख्यतः हिंदी भाषेस धरून केलेलें आहे. तसेंच अप्रकाशित असला तरी अलाहाबाद विद्यापीठांतील डॉ. हरदेव बाहरी यांचा 'हिंदीची अर्थप्रक्रिया' हा प्रबंधहि इतर भाषांच्या अभ्यासकांस मार्गदर्शक होण्यासारखा आहे. मद्रास विद्यापीठाचे श्री. सेथु पिलई यांचा तामीळ भाषेवरील अर्थविज्ञानात्मक ग्रंथहि या दृष्टीने उल्लेखनीय आहे. तेव्हा मराठीच्या अभ्यासांतील हें उपेक्षित अंग पूर्ण करून तिला इतर भाषांच्या पंक्तीस आणून बसविणें हें स्वतःस मराठीचे उपासक म्हणविणाऱ्यांचें एक कर्तव्य आहे असें आम्हांस वाटतें.

## शब्दास अर्थ कसा प्राप्त होतो ?—

या प्रश्नाचा विचार करणें म्हणजे शब्द व अर्थ यांतील परस्परसंबंध दाखविणें असून या संबंधावरच अर्थविज्ञानाची उभारणी झालेली आहे असें दिसून येईल. या विषयासंबंधीं पाश्चात्यांनी केलेल्या विचाराचा आढावा घेतांना प्रथम उल्लेख प्रसिद्ध ग्रीक तत्वज्ञ हेरॅक्लिटस व डेमॉक्रिटस यांचा करावा लागतो. या दोघांचीं एतद्विषयक मतें परस्परविरोधी आहेत. हेरॅक्लिटसच्या मतें शब्द व त्याचा अर्थ यांतील संबंध अनादि व स्वतःसिद्ध असून त्याचें हें म्हणणें आपल्याकडील मीमांसकांच्या मतांशीं जुळतें आहे. याच्या उलट, शब्दार्थांमधील संबंध हा सर्वस्वीं मानवनिर्मित आहे असें डेमॉक्रिटसचें म्हणणें असून तें आपल्याकडील नैयायिकांच्या मताशीं (त्यांतील 'संकेता'ची कल्पना वगळून) जुळतें आहे. यानंतर हा विचार प्लेटो व ॲरिस्टॉटल यांनी केलेला असून या गुरुशिष्यांचीं मतेंहि अशींच परस्परविरोधी आहेत. प्लेटो भाषेस नैसर्गिक किंवा स्वयंभू मानतो, तर भाषा ही कांही सामाजिक संकेतांतून जन्मास आली असें ॲरिस्टॉटल म्हणतो. हा वाद गेल्या शतकापर्यंत चालू होता व अजूनहि म्हणजे त्याचा निवाडा झाला आहे असें म्हणतां येत नाही. वादाचा मुख्य विषय असा. शब्द व त्याचा अर्थ किंवा भाषा व विचार हीं एकरूप (identical) आहेत, की भाषा हें विचाराचें केवळ एक वाहन आहे ? याबाबत प्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ प्रो. व्हिटने[१] यांनी भाषेचा पहिला आवेग हा

१. W. Whitney : Origin of Language.

आंतून आला की बाहेरून आला, म्हणजेच तो मानसिक की शारीरिक असा मूलभूत प्रश्न उपस्थित केला असून त्याचें उत्तर त्यांनी मनाच्या बाजूने दिलें आहे. भाषा हा एक सामाजिक संकेत आहे या ॲरिस्टॉटलच्या मतास विरोध करणारी ही विचारसरणी Emotive theory या नांवाने ओळखली जाते. असो. शब्दार्थसंबंधाविषयी पौर्वात्यांचीं मतें पाहतां एक गोष्ट प्रारंभींच स्पष्ट होते ती अशी, की या प्रश्नाच्या आंतरिक किंवा मानसिक बाजूवर पौर्वात्यांनी अवास्तव भर दिलेला असून त्यामुळे त्यांचे एतद्विषयक विचार भाषाविज्ञानाचें क्षेत्र ओलांडून त्यापलीकडे असणाऱ्या तत्वज्ञानाच्या क्षेत्रांत प्रवेश करतात. भाषा म्हणजे साकार असा विचार हें प्राचीन ग्रीक मत पौर्वात्यांसहि मान्य दिसतें.[1] यापुढे जाऊन शब्द व त्याचा अर्थ यांतील अभेद्य साहचर्य ध्यानीं घेऊन ध्वनीस अर्थ प्राप्त केव्हा व कसा होतो या प्रश्नाची चर्चा पौर्वात्यांनी केली आहे. यासंबंधीं लिहितांना विचार व भाषा, किंवा शब्द व त्याचा अर्थ हीं एकरूप होत, मनांतील विचारांचा आविष्कार भाषारूपाने होतो व उलट भाषेचें अधिष्ठान मनांत विचाररूपाने असतें असें मत उपनिषत्कारांनी व्यक्त केलें आहे. उपनिषदांतील पुढील दोन वचनें उल्लेखनीय आहेत —

'स मनसा वाचं मिथुनं समभवत् ।'— (बृहदारण्यक)

'वाङ् मे मनसि प्रतिष्ठिता, मनो मे वाचि प्रतिष्ठितम्'— (ऐतरेय)

कार्य हें शेवटीं त्याच्या अंतिम कारणांतच विलीन होणार हें सिद्ध करतांना शंकराचार्यांनीहि विचार व तदर्थक ध्वनि यांत ध्वनीस गौण लेखिलें आहे (शांकरभाष्य, वेदान्तसूत्रें,४. २. १.). छांदोग्यांत तर स्पष्टपणेंच म्हटलें आहे, की माणसाची ध्वनिशक्ति ही मरणोत्तर त्याच्या मनांत व मन प्राणांत विलीन होतें.[2] वेदांतांतील अद्वैताची भूमिका स्वीकारल्यामुळे पौर्वात्यांनी शब्द व त्याचा अर्थ हे तत्वतः एकरूप मानलेले दिसतात. अंतिम दृष्टीने विचार करतां दिसणारा शब्द व त्याचा अर्थ यांतील अभेद पाहूनच की काय, भर्तृहरीने आपल्या 'वाक्यपदीय' या ग्रंथांत शब्द व अर्थ हीं एकाच वस्तूचीं दोन अंगें मानलीं आहेत.[3] इतकेंच नव्हे, तर शब्दार्थांतील हें अद्वैत आणखी पुढे नेऊन विश्व हा त्या शब्दब्रह्माचाच विवर्त होय असें भर्तृहरि म्हणतो. हा विचार क्रिश्चन धर्मशास्त्रांतील 'लोगॉस' ( Logos ) या कल्पनेशीं संबद्ध आहे. असो. शब्द व त्याचा अर्थ यांतील हा संबंध मूलभूत व नैसर्गिक आहे असें भर्तृहरीचें म्हणणें आहे.[4] शब्दास 'वाचक' व तद्दर्शित वस्तूस किंवा अर्थास 'वाच्य' म्हटलें जातें ही गोष्टहि शब्द व अर्थ यांतील परस्पराश्रयच दर्शविते. भर्तृहरि 'शब्दानां यतशक्तित्वम्' असें म्हणतो तेव्हा त्यास शब्दाच्या स्वरूपांत स्वभावतः अंतर्भूत असणारी अर्थशक्ति सूचित करावयाची आहे. तसेंच आपलीं इंद्रियें व त्यांचे विषय यांतील संबंध जसा अनादि आहे, तद्वतच शब्द व त्याचा अर्थ यांमधील संबंधहि अनादि असल्याचें भर्तृहरि सांगतो.[5] यापुढे जाऊन

१. प्रत्यक्चैतन्यरयान्तः सन्निविष्टस्य परबोधनाय शक्तिरभिस्यन्दते ।
—( पुण्यराजकृत वाक्यपदीयटीका, १-१ )

२. पुरुपस्य प्रयतो वाङ्मनासि संपद्यते ।—( छां. ६. ८. ६ ).

३. एकस्यैवात्मनो भेदौ शब्दार्थावपृथक्स्थितौ ।—( वाक्य० २. ३१ ).

४. संबंधः समवस्थितः । स्वभावत एव निरूढो न तु पुरुषेण निवेशितः ।—
( वाक्य० संबंधसमुद्देश ).

५. अनादिरर्थैः शब्दानां संबंधः ।—( वाक्य० ३-२९ ).

त्याने शब्द व ज्ञान यांतील साधर्म्य दाखविलें आहे. ज्ञान हें ज्याप्रमाणे स्वत:ची जाणीव करून देऊन वर ज्ञेय वस्तूचीहि करून देतें, तद्वत् शब्द हा स्वतःच्या रूपाबरोबर अर्थाचें रूपहि दाखवितो. म्हणजे ज्ञान व ज्ञेय या जोडीप्रमाणे शब्द व अर्थ हीं अंतीं एक होत असें भर्तृहरीचें म्हणणें आहे ( वाक्य० १. ५० ). कालिदासाने रघुवंशाच्या प्रारंभीं सूचित केलेला वाक् व अर्थ त्यांतील अभेद प्रसिद्ध आहे.

वरील चर्चेचें तात्पर्य असें, कीं शब्द व त्याचा अर्थ, किंवा कल्पना व तद्दर्शक शब्द यांत कोणत्या ना कोणत्या प्रकारचा, पण निकट असा संबंध आहे. मीमांसकांच्या मतें हा संबंध अनादि, नित्य व स्वाभाविक तर नैयायिकांच्या मतें तो सांकेतिक स्वरूपाचा, अर्थात् कांहीसा कृत्रिम आहे. वाक्यपदीयकार भर्तृहरीने मीमांसकांच्याहि पुढे जाऊन शब्द व अर्थ यांत अभेद मानला आहे, हें आपण पाहिलेंच. मीमांसकांचें म्हणणें मान्य केल्यास शब्दाच्या अंगीं असणारी अर्थशक्ति दैवी मानावी लागते व हें मत नैयायिक व वैशेषिक हे दोघे सोडून इतरांना मान्य दिसतें. ' वाग्वै सम्राट् परमं ब्रह्म ' ( बृ. ४ १.२ ) यासारख्या औपनिषदीय वचनांतून आढळणारी वाक्पूजा वरील मतप्रणालीस पोषकच आहे. उपनिषत्कारांनी ' वाक् ही तेजोमयी आहे ' असें जें म्हटलें त्यांतील अभिप्राय हाच दिसतो ( छां. ६.५.४; बृ. ३.१.३ ). या म्हणण्यांत वाचेचा किंवा शब्दाचा गौरव असला तरी तें वस्तुस्थितीस धरून आहे असें मानणें अवघड होईल. कारण अमुक शब्दाने अमुक अर्थ ' बोद्धव्य ' आहे ही ईश्वरेच्छा होय असें म्हणणें म्हणजे एक तर पर्यायाने शब्दार्थयोग अनाकलनीय आहे हें कबूल करणेंच होय. शिवाय शास्त्राच्या क्षेत्रांत अमुक एक गोष्ट ईश्वरनिर्मित म्हणून निकालांत काढणें अशास्त्रीय होईल. तेव्हा शब्दार्थयोग स्पष्ट करण्यासाठी संकेत-सिद्धान्ताकडे वळल्यावांचून गत्यंतर नाही. मात्र या संकेताचें स्वरूप नैयायिकांच्या ' संकेता 'हून फार निराळें आहे. कारण नैयायिकहि पुन: त्यांच्या ' संकेता 'चें उगमस्थान म्हणून ईश्वरेच्छेकडेच बोट दाखवितात. किंबहुना, त्यांच्या मतें संकेत म्हणजेच ईश्वरेच्छा होय. नैयायिक शब्द व त्याचा अर्थ यांत ' संयोग ' काय किंवा ' समवाय ' काय कोणत्याहि प्रकारचा संबंध मानीत नाहीत. ' शब्दार्थौ असंबद्धौ ' असा त्यांचा सिद्धान्त आहे. साहजिकच शब्दापासून जो अर्थबोध होतो तो शब्द व अर्थ यांत कांही संबंध दिसतो म्हणून नव्हे, तर ' संकेता 'ने म्हणजेच ईश्वरेच्छेमुळे होतो असें त्यांचें म्हणणें आहे. तसेंच हा ' संकेत ' अनादि कालापासून चालत आलेला असल्याने ' शब्दार्थव्यवहार-रहित ' असा काल त्यांच्या मतें मानतांच येत नाही. म्हणून त्यांनी संकेताचे ' आजानिक ' व ' आधुनिक ' असे दोन भेद मानले आहेत. पैकीं आजानिक संकेत हा सनातन अर्थात् ईश्वरनिर्मित असून पारिभाषिक संज्ञांतून गुणवृद्धिरूपाने आढळणारा आधुनिक संकेत हा मानव-निर्मित आहे. नैयायिकांची ही संकेतविषयक कल्पना आधुनिक भाषाविज्ञानास अभिप्रेत नाही. तसेंच शब्द व त्याचा अर्थ यांमधील संकेत हा एक प्रकारचा सामाजिक करार होय हें ॲरिस्टॉटलचें मतहि भाषाशास्त्रास मान्य होण्यासारखें नाही. व्हिटने यांनी A society never met together to make a language असें म्हणून ॲरिस्टॉटलच्या मतांतील हास्यास्पदता उघड केली आहे. तेव्हा संकेत म्हणजे एक सामाजिक करार असें फार तर लक्षणेने म्हणावें, वाच्यार्थानें नाही. मग शब्द व अर्थ यांतील संकेताचें खरें स्वरूप तरी कोणतें ? तर अनेकांची मूक संमति किंवा रूढि (Social convention) हा संकेत या शब्दाचा खरा अर्थ आहे. शब्दार्थांमधील संकेत माणसांनीच रूढ केलेले असतात. भाषा ही मुख्यत: विचारांच्या देवघेवीसाठी असते व व्यवहारांत विचारांची ही देवघेव मोठ्या जाणिवेने किंवा हेतुपूर्वक

होते असें नाही, तर कोणीतरी आपल्या मनांतील अभिप्राय व्यक्त करण्यासाठी म्हणून कांही तरी शब्द वापरतो, ऐकणारास तो कळतो व पटतो. साहजिकच तोहि त्या शब्दाचा पुनः त्याच अर्थी उपयोग करतो व अशा रीतीने तो शब्द व त्याशीं संबद्ध असलेला अर्थ सर्वांना मान्य होऊन शब्द रूढ होतो. हाच संकेत होय व सामाजिक ऐकमत्य हें त्याचें अधिष्ठान होय. किंबहुना हें ऐकमत्य म्हणजेच संकेत व हीच त्या शब्दाची 'शक्ति' होय असें म्हणण्यास हरकत नाही. शब्दार्थांमधील या संकेताचें स्वरूप अतात्विक असणार, म्हणजे त्याला कांही कारण किंवा उपपत्ति नसणार, हें उघड आहे. असो. याशिवाय यास्काचार्य-प्रणीत 'शब्दानुकृति', डॉ. गायगर यांचा अनुकरणवाद, किंवा रिचर्ड पॅगेट यांचा अभिनयवाद यांसारख्या आणखी कांही शब्दार्थविषयक उपपत्ति असल्या तरी त्यांचा समावेश 'संकेत' या एका शब्दांत होत असल्याने त्यांचा निराळा विचार करण्याचें कारण नाही. संकेत, सामाजिक संकेत हा शब्दार्थयोगाचा प्राण असून तो वक्ता आणि श्रोता यांतील 'संवादा'वर अवलंबून आहे. या दोघांच्या मनांतील अभिप्रायांमध्ये अंतर पडूं नये अशी व्यवस्था 'संकेत' करतो. ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायाच्या प्रारंभीं वक्ता आणि श्रोता यांच्यामधील सामरस्य किंवा संवाद वर्णितांना ज्ञानेश्वरांनी म्हटलें आहे "म्हणौनि संवादाचा सुवाऊ ढळे। तरी हृदयाकाश सारस्वतें ओळे।" ज्ञानेश्वरांचा हा सिद्धान्त जसा वक्तृत्वास तसाच अर्थविज्ञानासहि लागूं आहे. कारण बोलणारा व ऐकणारा यांच्यामध्ये कांही संकेत असेल तरच त्यांच्यांत 'संवाद' निर्माण होणार, व उलटपक्षीं त्या दोघांत 'संवाद' असल्यावांचून त्यांच्यांतील 'संकेता'स कांही अर्थ उरणार नाही. सारांश, शब्द व अर्थ यांमधील संकेत, आणि वक्ता व श्रोता यांमधील संवाद हीं एकाच तत्वाचीं दोन अंगें होत.

---

## हे खिस्ता, बुद्धा—

मी हसतों जरि हर्षभराने
फुलवित उधळित स्मितसुषमा
　　परी कुठे तरी दूर दूर त्या
　　मनांतला खण राही रिकामा !

मी दिपलों प्रकाश पाहुन
मोहरलों तेजाने कणकण
　　परी कुठे तरी दूर दूर त्या
　　मनांत वसतें काळोखेपण !

मी रमलों जरि सुखसंवादीं
वदलों निर्भर चतुरपणा
　　परी कुठे तरी दूर दूर त्या
　　मनांत थिजला मूकपणा !

मी माझ्या तृप्तींत विसावें
कला, कीर्ति, सखि साथ करी
　　परी कुठे तरी दूर दूर त्या
　　मनांत झुरतें कांही तरी !

मी बघतों लावण्यसंपदा
निसर्गसुंदर प्रसन्नसा
　　परी कुठे तरी दूर दूर त्या
　　मनांत नांदे खिन्नपणा !

मी लढतों मनांत माझ्या
संघर्षांच्या या अंतीं
　　सांग सांग हे खिस्ता, बुद्धा
　　मिळेल का मज तुमची शांती ?

— राजा मंगळवेढेकर.

# मुकुंदराजाचा स्थलनिर्णय ( उत्तरार्ध )

सुरेश म. डोळके

प्रास्ताविक

अंतरंगाच्या दृष्टीने ' वैण्येगंगेचा तीरीं । मणोहर अंबाणगरी । तेथ प्रगटले श्रीहरी जगदीश्वरु ॥' ( वि सिं. उत्तरार्ध, ११·३७ ) या ' विवेकसिंधू 'च्या ओवींतील प्रत्येक पदाचा विचार करून मुकुंदराजांनी उल्लेखिलेलें ' तीर ' हें मराठवाड्यांतील ' बाणगंगेचें ' नसून नागपूर–भंडाऱ्याची सीमारेषा असलेल्या ' वैनगंगे'चें होय व ' मणोहर अंबाणगरी ' ही ' आंबे–जोगाई ' नसून अंभोर होय असें मागील लेखांकांत दाखविलें आहे. या लेखांकांत प्रस्तुत ओवीच्या अनुषंगाने इतरहि पुराव्यांचा विचार करून मुकुंदराजांच्या स्थलनिश्चितीवर काय प्रकाश पडतो तें पाहूं.

वरील ओवीच्या दुसऱ्या ओळींतील ' श्रीहरी ' व ' जगदीश्वरु ' या पदांबद्दल सुरुवातीलाच थोडें स्पष्टीकरण करणें अवश्य आहे. ' जगदीश्वरु ' हें ' श्रीहरी 'चें विशेषण नसून तीं दोन्ही वेगवेगळीं नामें आहेत. ' श्रीहरी ' म्हणजे ज्यांनी शंभूला प्रसन्न करून घेण्याकरिता ' अतिगहन ' असें ' अनुष्ठान ' ' आदरिलें ' होतें ( वि. सिं. उत्तरार्ध; ११–४९ ) ते मुकुंदराजांचे आजेगुरु श्रीहरीनाथ महाराज व ' जगदीश्वरु ' म्हणजे ज्याने आपलें ' तेजोरूप प्रकाशलें ' ( वि. सिं. उत्तरार्ध; ११–८२ ) तो आदिनाथ शंकर. भारतीय भक्तिपंथांतला हरिहरांचा वाद प्रसिद्धच आहे. स्वतः मुकुंदराजांनीच विष्णूला आणि शंकराला उद्देशून ' हरि ' आणि ' हर ' असे शब्द ' विवेकसिंधू 'तच अनेकदा वापरले आहेत. मात्र, प्रस्तुत ओवींत उल्लेखिलेले श्रीहरी म्हणजे श्रीविष्णु नसून श्रीहरीनाथच होत. याचें एक कारण असें, की मुकुंदराज जेव्हा जेव्हा ' हरी ' हा विष्णुवाचक शब्द वापरतात, तेव्हा तेव्हा ' हर ' हा शब्द योजून शंकराचा व लगेच ब्रह्मदेवाचाहि उल्लेख करितात. ब्रह्मदेवाच्या उल्लेखाव्यतिरिक्त ' हरिहर ' असा जोडशब्द मुकुंराजांनी फक्त एकदाच वापरल्याचें कांही पोथ्यांवरून दिसतें. ती ओवी अशी—

> मग काय तेथे वर्तलें । हें होतां नाही जाणितलें ।
> मग हरिहर संवादले । तें अवधारिजो ॥ ( वि. सिं. उत्तरार्ध; ११–६० )

या ओवींतील 'हरिहराचा' अर्थ हरीनाथ आणि शंकर असा होतो. विष्णु आणि शंकर असा होत नाही. कारण, इथे हरिहरांबरोबरच 'ब्रह्मयाचा' उल्लेख नाही हें एक; आणि पुढल्याच ओवींत ' सदाशिवें वरु माग म्हणितलें । तंव श्रीहरीनें विनविलें ' असें मुकुंदराजांनीच स्पष्ट सांगितलें आहे हें दुसरें.

' वैण्येगंगेचा तीरीं...' या ओवींतील श्रीहरी म्हणजे श्रीहरिनाथ व ' जगदीश्वरु ' म्हणजे शंकर असें मानण्याचें आणखी एक कारण असें, की या ओवींनंतरच्या जवळजवळ साठ

---

१ विवेकसिंधू—पूर्वार्ध; १-१; ३–६२; ४–६५. उत्तरार्ध, ५-२३; ५–७९; ७·८१; ११-४८; ११-६०.

ओव्यांत मुकुंदराजांनी हरिनाथांचें व शंकराचें वर्णन केलें असून प्रत्येक वेळीं हरिनाथांचा उल्लेख ' श्रीहरी ' ह्याच नांवाने केला आहे[२]. शंकराला उद्देशून मात्र त्यांनी शंभु, श्रीहरु, चैतन्य, श्रीमहादेव, श्रीआदिनाथु, जगदीश्वरु, सदाशिव इत्यादि विशेषणें वापरलीं आहेत. प्रस्तुत ओवींतील ' प्रगटले ' हें क्रियापद्क अनेकवचनी असून श्रीहरीनाथ व शंकर या दोघांनाहि तें लागू पडतें.

' तेथ ' प्रगटले ' श्रीहरी—'

' वैनगंगे'च्या तीरावरील 'मणोहर अंबाणगरी'ला ' श्रीहरी'ने त्रिभुवनालाहि पोळणारी ' तपश्चर्या करून शंकराला कसें प्रसन्न करून घेतलें, होमांत टाकलेल्या पूर्णाहुतीच्या घृतधारेबरोबर ' स्वयंज्योति ' कशी प्रगटली, हरिनाथांच्या मुखांतून त्यांच्यांत ' शक्तिसंचार ' कसा झाला, ' शक्तिस्वीकारा 'नंतर हरीनाथांची कशी उन्मन्यवस्था झाली वगैरेंचें सविस्तर वर्णन मुकुंदराजांनी ' विवेकसिंधू 'च्या शेवटल्या अध्यायांत केलें आहे. अर्थात् हरीनाथांचें निवासस्थान ' अंबाणगरी ' हेंच होतें असें त्यावरून जसें दिसून येतें तसेंच, ' तेथ प्रगटले श्रीहरी ' यांतील ' प्रगटले ' या क्रियापदावरून हरीनाथांचें तें जन्मस्थानहि असावें असें दिसून येतें. मुकुंदराजांनी हरीनाथांच्या उग्र आणि एकाग्र तपश्चर्येची, त्यांच्या तपःसामर्थ्याची, आणि ' शक्तिस्वीकारा ' नंतर झालेल्या त्यांच्या उन्मन्यवस्थेची माहिती ' विवेकसिंधू 'त दिली आहे. त्यांचा जन्म ' अंबाणगरी 'ला झाला होता ( वि. सिं; उत्तरार्ध; ११–३७ ), त्यांचें ' मेखळाबंधन ' तिथेच झालें होतें ( वि. सिं; उत्तरार्ध; ११–४२ ), त्यांनी ' अतिगहन ' असें ' अनुष्ठान ' अंबानगरीला केलें होतें ( वि. सिं; उत्तरार्ध; ११–४९ ), त्यांनी शंकराला तिथेच प्रसन्न करून घेतलें होतें, आणि त्यांची समाधिहि ' अंबाणगरी 'ला म्हणजे आंभोऱ्यालाच आहे. यावरून, त्यांच्या आयुष्याचा बहुतेक काळ आंभोऱ्यालाच गेला असला पाहिजे हें उघड आहे.

' संतचरित्र ' ऊर्फ ' धर्मपुरीमहात्म्य ' या नांवाची एक हस्तलिखित पोथी मला मिळाली असून ती विठ्ठल नांवाच्या कवीने लिहिली आहे. त्यानेच शके १७५१ मध्ये ' मधुपुरीमहात्म्य ' हा दुसरा ओवीबद्ध ग्रंथ लिहिला[३]. ' धर्मपुरीमहात्म्यांत ' मुकुंदराज व हरीनाथ यांची थोडी माहिती आढळते. तिचा विस्तार करून केशव जयराम नांवाच्या कवीने ' भक्तिरहस्य ' हा ग्रंथ शके १७७९ मध्ये लिहिला. त्यांत हरीनाथ, रघुनाथ व मुकुंदराज यांची पुष्कळ माहिती दिली आहे. प्रस्तुत ग्रंथांचें स्वरूप पौराणिक असल्यामुळे त्यांतल्या माहितीच्या सत्यासत्यतेबद्दल मनांत संशय निर्माण होतो. त्याशिवाय दुसरा एक पुरावा मला मिळालेला आहे. त्यावरून १४४ वर्षांपूर्वी हरीनाथांचें चरित्र लिहिण्याच्या इच्छेने एका कवीने ' कागद–पोथ्या ' पाहून व विद्वानांना विचारून गोळा केलेली बरीच माहिती अभ्यासकांसमोर येते.

---

२. विवेकसिंधू; उत्तरार्ध; अध्याय ११; ओव्या—६१; ७४; ७८, ८१; ९१; ९२; ९३; ९४; ९६; ९८; ९९; १००; १५०.

३. ' तरुण भारत ' नागपूर; ता. १५–७–१९५०.

एक पत्रें—

श्रीमाधवस्वामी

ह. भ. परायेण मुरहर महाराज पाठक वस्ती कळंवेश्वर चरनसेवेशी गोविंद रघुनाथ हळदे मु॥ फणींद्रपुर सा. न. आपण माझेकडे श्रीक्षेत्र अंबानगरी हली नाम आंभोर येथील श्रीहरीनाथाचे चेरित्र लिहीतो म्हणुन तेथील माहीती विचारीली त्याबद्दल सविस्तर माहीती तेर्थील विदवान लोकाकडून व तेथील कागद व पोथ्या पाहून खालि लीहीली ती येणेप्रमाणे वैण्यगंगातीरावर अंबावती नगरी तीला हलि राजे भोसले सरकारनी ब्रॅंच गांवाचे नांव बद्दले त्याचप्रमानें येथील नांव आंभोर ठेविले तेथें हरीनाथाचा जन्म मातोश्री सरस्वती व पीता नामे सत्यदेव उपनाम जोशी हे होत श्रीहरीनाथाचा जन्म सम्मत १२१५ झाला माहिती विवेकसिंधुत पहावी हरीनाथाची तपश्चर्या वाराणशींत झाली तपश्चर्येचे वेळी चंद्रनगर येथून बाबडे वंशांतील रघुनाथ उर्फ रामचंद्र हरीनाथास शेरण आला पुढे त्याला वाराणशींत नेवून मधुकरीस पाठविले तेवेळी मुकुंदज्योतिशाने त्याचे मरण सांगितले व त्याचे मरण हरीनाथानी चुकवले नंतर दुसरे दिवसी त्या मुकुंदभट्टाचे येथे मधुकरीस पाठविले तेंव्हा त्याने गणीत करुन पाहतां याला मरनच नाहीं हा अमर आहे म्हणून तो रघुनाथास शेरन येवून त्या दोघांचे मागोमाग अंबनगरी येथे आला व चरणावर लीन होवून कृतार्त केला व मुकुंदराज नाम दीले तो तेथेच राहत होता त्याचेवर रघुनाथाचे समोर यज्ञ होवून काशी विश्वेश्वर प्रगट झाले तेच हली चैतन्येश्वर आहेत. पुढे हरीनाथांनी समाधी घेते वेळी रघुनाथाचे विनंतीवरून त्यालाही आपलेसमोर समाधी दिली ते दोघेही एके ठीकाणी आहेत समाधी घेते वेळी मुकुंदराजास विवेकसिंधु करणेस सांगुन एक वेताची काठी देवून भोपाळ नगरीस जयंतपाळास समाधी घोड्यासहीत लावून गंधर्व घोड्याचा उधार करावा व विवेकसिंधुचा बोध करावयास प्रेमाने मुकुंदराज शके ११११ ला भोपाळास गेला ही माहीती पाठवित आहो. कळावे ती० स्व० रा० बापुजी वाचासुंदर यांस सा० न० कळविने मीती चंद्र माघ शु॥५ शके १७३१.

आज्ञाधारक
गोविंद रघुनाथ उर्फ बापुजी हळदे
मु॥ फणीपुर.

पत्राची विश्वसनीयता—

या पत्रांतील कांही माहितीच्या विश्वसनीयतेबद्दल मला शंका वाटते. हरीनाथांच्या तपश्चर्येच्या स्थळासंबंधी प्रस्तुत पत्रांतील विधान मान्य करतां येण्यासारखें नाही.–' विवेकसिंधू 'त त्याविरुद्ध पुरावा आहे. तथापि शके १७३१ पूर्वीच्या वाङ्मयांतून प्रस्तुत पत्राच्या विरुद्ध अस्सल पुरावा जोपर्यंत पुढे येत नाही तोपर्यंत त्यांतील इतर विधानांच्या सत्यतेबद्दल प्रत्यवाय नसावा. मुकुंदराजांचे गुरु रघुनाथ व त्यांचेहि गुरु हरीनाथ यांच्यासंबंधी लेखनशकासहित माहिती देणारा पहिलाच उल्लेख याहि दृष्टीने या पत्राचें महत्त्व विशेष आहे असें मला वाटतें.

४. हें पत्र, विदर्भांतील संतकाव्यांचे संशोधक श्री. रामचंद्र विठ्ठल ऊर्फ बाबाजी बोबडे यांना कळमेश्वर ( नागपूरपासून १४ मैल ) येथील श्री. नानासाहेब पाठक यांच्याकडील हस्तलिखितें चाळीत असतांना मिळालेलें आहे.

हरीनाथांचें चरित्र नागपूर प्रांतांतीलच लेखकाला लिहावेसें वाटावें, त्याने वैनगंगेच्या तीरावर अंभोर येथेच देवालय बांधणाऱ्या नागपूरच्याच एका विद्वानाला ती माहिती विचारावी आणि त्यानेहि ' विद्वान लोकांकडून ' व ' कागदपोथ्या पाहून ' ती अगत्याने पुरवावी यावरूनहि ' वैण्येगंगेचा तीरी । मणोहर अंबाणगरी—' या ओवींत मुकुंदराजांनी उल्लेखिलेली ' वैण्येगंगा ' व ' अंबाणगरी ' कोणती असावी यावर स्पष्ट प्रकाश पडतो.

## आणखी एक कागद व दोन अभंग—

वरील पत्राप्रमाणेच कळमेश्वर येथील मठांत आणखी एक कागद उपलब्ध झाला आहे. कागदावरील अक्षरें मोडींत लिहिलेलीं असून त्यांत हरीनाथ व रघुनाथ यांचा समधिशक दिलेला आहे. हरीनाथांचा जन्मशक व जन्मस्थळ देतांना प्रस्तुत लेखक सुरुवातीलाच म्हणतो—

॥ श्री ॥

" श्रीमन्नृपशालीवान शके १०८१ प्रभवनाम संवत्सरी श्री हरीनाथ महाराज अंबानगरी येथे जन्मास आले. नंतर शके १०९० धाता नाम संवत्सरी रघुनाथ उर्फ रामचंद्र बोंबडे शशीग्रामवासी अंबनगरीस हरीनाथास शरण आला पुढे त्याचा मृत्यु काशिक्षेत्री चुकविला व मुकुंदभट्ट काशिवरून येथे आले त्याला रघुनाथकडून उपदेश देऊन श्रीहरीनाथ यांनीं मुकुंदराज केला.... .."

या कागदाचे शेवटीं लेखनशक दिलेला नसल्यामुळे तो कधी लिहिला गेला हें निश्चित कळायला अंतर्गत असा कांहीच पुरावा नाही. दुसरें असें की, प्रस्तुत कागद कळमेश्वर येथे मुरहर महाराज पाठक यांच्याच मठांत मिळाला. मुरहर महाराजांनी हरीनाथाचें चरित्र लिहिण्याचें योजलें होतें, त्याकरिता त्यांनी हरीनाथांबद्दलची माहिती, कागदपत्रें वगैरे जमविण्याला सुरुवातहि केली होती. प्रस्तुत कागद, त्यांच्या या संशोधनांतच त्यांना मिळाला असावा. या दृष्टीने वरील पत्रापेक्षाहि, प्रस्तुत कागद अधिक जुना असण्याचा संभव आहे. मुरहर महाराजांच्या हातचा तो नाही हें खास.

मुरहर महाराजांनी, योजल्याप्रमाणे हरीनाथांचें चरित्र लिहिलें की नाही हें कळायला कांही मार्ग नाही. पण, त्यांच्या स्वतःच्या हस्ताक्षरांत लिहिलेली त्यांच्या अभंगांची एक वही मला मिळाली, तींत हरीनाथांबद्दल दोन अभंग लिहिलेले आढळतात. ते इथे उध्दृत करतों—

॥ अभंग ॥

वैण्यगंगातीरी । अंबावती पुरी । जन्मले मुरारी । हरीनाथ ॥ १ ॥
सरस्वती माता । सत्यदेव पीता । तया पोटी स्वता । देव आला ॥ २ ॥
वय पांच वरुष्य । झाले देवरुषी । व्रतबंद त्यासी । करी पीता ॥ ३ ॥

५. श्री. बापूजी हळदे ( मु।। फणींद्रपुर ) यांनी १५० वर्षांपूर्वी अंभोर येथे हरीनाथांच्या समाधीजवळच लक्ष्मीनारायणाचें देवालय बांधलें असून मोहपा, काशी, रामटेक इत्यादि ठिकाणींहि निरनिराळीं १२ देवळें बांधलीं आहेत. विठ्ठलाच्या ' मधुपुरीमहात्म्यांत ' हि ( हस्तलिखित; लेखनकाल : शके १७५१ ) बापूजींनी मोहपा येथील मुरलीधराचें देऊळ बांधल्याचा उल्लेख असून त्यांचा काळ १४० वर्षांपूर्वीचा दिला आहे. मोहपा व आंभोरा येथील देवळांची वहिवाट आज श्री. आप्पासाहेब हळदे यांच्याकडे आहे.

वेद विद्या ज्ञान । जाहले ते पूर्ण । करी आराधन । विश्वेशाचे ॥ ४ ॥
नित्य निरंतर । काशी विश्वेश्वर । स्मरितसे फार । हृदयांतरी ॥ ५ ॥
प्रतिदिनी जाय । वाराणसी पाहे । शंकर तो ध्याय । पुरश्चरणी ॥ ६ ॥
किर्ती ऐकूनिया । रघुनाथ पाया । दुसरे नाम तया । रामचंद्र ॥ ७ ॥
चंद्रनगर स्थान । जन्मभुमी जाण । आला तो शरण । हरीपाई ॥ ८ ॥
मुरहर म्हणे । संतसंग करणे । तेणे पार होणे । भवसिंधु ॥ ९ ॥

॥ अभंग ॥

हरिने तयाला । वाराणसी नेला । जीवन्मुक्त केला । मृत्युलोकी ॥ १ ॥
दिव्य झाली काया । तया रघुराया । उपनाम तया । बोबडीया ॥ २ ॥
मुकुंदभट्ट येता । शरण हरीनाथा । पदी ठेवी माथा । दोघाचीया ॥ ३ ॥
उपदेश देई । रघुनाथ पाही । हरी सांगे त्याही । आज्ञा ऐसी ॥ ४ ॥
स्वये हरीनाथे । हस्त ठेवी त्याते । मस्तकावरूते । मुकुंदाचे ॥ ५ ॥
मुकुंदभट्ट जया । नाम होते तया । करोनिया दया । पूर्ण केला ॥ ६ ॥
मुकुंदराज योगी । नाम तया लागी । जीवन्मुक्त जगी । केला त्याते ॥ ७ ॥
वर देवोनिया । ग्रंथ करोनिया । सांगे तया जाया । भोपाळासी ॥ ८ ॥
मुरहर म्हणे । ऐसा संत होणे । तरीच पावणे । मोक्षपद ॥ ९ ॥

**हरीनाथांचा स्थलनिर्णय—**

वर एक पत्र, एक कागद आणि दोन अभंग उद्धृत केले आहेत. त्यांवरून हरीनाथ, रघुनाथ, व मुकुंदराज यांच्या स्थलांविषयी बरीच माहिती मिळते. त्याविरुद्ध पुरावा जर खुद्द 'विवेकसिंधू'त आढळत नसेल (—म्हणजे अंतरंग पुरावा जर बाह्य पुराव्याच्या विरुद्ध जात नसेल—) तर, आणखी विश्वसनीय पुरावा पुढे येईपर्यंत, तो सत्य मानायला प्रत्यवाय नसावा. अंतरंग पुराव्याची साक्ष ही, सत्यान्वेषणाच्या दृष्टीने, सर्वांत महत्त्वाची असते. त्या दृष्टीने, खुद्द मुकुंदराजांनी हरीनाथांच्या स्थलाविषयी 'विवेकसिंधू'त काय सांगितलें आहे हें पाहूं :—

हरीनाथांचा जन्म 'वैण्येगंगे'च्या तीरावर असलेल्या 'मणोहर अंबाणगरी'ला झाला. वडिलांनी, त्यांचा 'मेखळा परिधान' विधि केल्यानंतर त्यांनी, तितक्या लहान वयांतहि, यत्किंचित् सायास न पडतां 'वेदशास्त्रांचा अभ्यासु' केला. आणि जसें श्रीकृष्णाने 'वाराणसीसी भवानिशंकर[६], तपें तोखविलें[७]'[८] किंवा 'महाविष्णूचा अवतार[९]' असलेल्या दत्तात्रेयाने 'गौतमींतीरी[१०]' शंकराला प्रसन्न करून घेतलें त्याप्रमाणे 'श्रीहरीने' अतिगहन असें अनुष्ठान व त्रिभुवनाला पोळणारी तपश्चर्या करून 'स्वयंज्योती'ला प्रगट व्हावयाला लावलें.

६. पद्मपुराण; स्वर्गखंड; ३६.
७. महाभारत; अनुशासनपर्व; ४५–४६.
८. पद्मपुराण; स्वर्गखंड –२८ ।
९. विष्णुपुराण; ४-११-३; वायुपुराण; २-३२, ४७–२४२; ब्रह्मपुराण; २१३, १०६–११० भागवत–१-३-११; महाभारतः सभापर्व ४८-१; ब्रह्मांडपुराण–३, ७३; मार्कंडेयपुराण १७.
१०. ब्रह्मपुराण (आनंदाश्रम प्रत) ११७.

तिन्हि देव गुनत्रयमुर्ति । जया देवाचिया शक्ति
तो प्रगटला स्वयंज्योति । श्रीआदिनाथु ॥ ( वि. सिं. उत्तरार्ध ११-५९ )

त्यानंतर 'हरि' आणि 'हर' 'क्षण येक......जाले सुलीन, आनंदसागरी'. या आनंदाचें वर्णन २० ओव्यांत मुकुंदराजांनी केलें आहे. (वि. सिं. उत्तरार्ध ११-६० ते ८०).

हरीनाथांचा 'स्थित्यानंद'!—

माझें तेज प्रगटैल । तें तुझ्या वदनिं प्रवेशैल ।
ते सिस्य देहि संक्रमेल । गुरुकृपाद्वारें ॥ ( वि. सिं. उत्तरार्ध, ११–८१)
यैसे आदिनाथ बोलिले । तव श्रीहरिने मुख पसरिलें ।
तेथे तेजोरूप प्रकाशलें । श्रीजगदीस्वरें ॥ ८२ ॥

हरीनाथांच्या मुखांत जगदीश्वराचें 'तेजोरूप' प्रवेशल्यानंतर

निर्विकल्प समाधी प्रकटली । दृष्टी अर्धोन्मीलित जाली
अहंता निःशेष निमाली । ब्रह्मानंद सागरीं ॥ (वि. सिं. उत्तरार्ध; ११–८४.)

बावीस दिवसानंतर 'समाधी विसर्जूनी आपैसा, उठता जाला (९१)' हरीनाथांच्या उन्मन्यवस्थेचं वर्णन मुकुंदराजांनी ९४ ते ९७ या ओव्यांत केलें आहे हरीनाथांनी रघुनाथाला देखील अशा रीतीनेच ब्रह्मानंद देऊन 'पूर्णबोध केला.'

कृपादृष्टि सरिसी । समाधि प्रवर्तली रामासी
उन्मेष घेऊनी मानसी । ब्रह्मानंद तो ॥ १०३ ॥
अठरा दिवस पर्यंत । जाला उन्मनी स्थित ।
मनोवृत्ति समस्त । खुंटलिया पै ॥ १०४ ॥

महानुभावांच्या तत्वज्ञानाप्रमाणे याला 'स्थित्यानंद' म्हणतां येईल[११]. शुकाचार्य किंवा परीक्षिति हे गर्भात असतांना त्यांना श्रीकृष्णापासून झालेल्या 'स्थिती'ला 'तूटसांद' होती. इथे प्रत्यक्ष आदिनाथ शंकरापासून हरीनाथांना किंवा हरीनाथांपासून रघुनाथांना झालेली स्थिती ही 'अतूट' होती असें म्हणावें लागेल. शंकराची गोष्ट एक सोडून द्या. भागवत धर्मानुसार तो तर प्रत्यक्ष ईश्वरच आहे. पण हरीनाथांपासून रघुनाथांना झालेला 'स्थित्यानंद' देखील 'कांही काळा'पुरता नसून अतूट होता हरीनाथांचा काळ जर चक्रधरांच्या व गोविंदप्रभूंच्या आधीचा ठरला, तर महानुभावांच्या आधीसुद्धा प्रत्यक्ष परमेश्वर किंवा परमेश्वरावतार यांच्याकडूनच केवळ नव्हे तर सिद्ध पुरुषांकडूनदेखील शिष्यांना स्थित्यानंद देण्याचा प्रकार अस्तित्वांत होता असें म्हणतां येईल.

## हरीनाथांचें तपस्यास्थल

हरीनाथांनी श्रीकृष्ण, किंवा दत्तात्रेय ( दत्त आत्रेय ) यांच्यासारखी उग्र आणि एकाग्र तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न करून घेतलें असें मुकुंदराजांनीच सांगितलें आहे. वर उध्दृत केलेल्या पत्रांत 'हरीनाथाची तपश्चर्या वाराणशींत झाली' असें स्पष्ट म्हटलें आहे. 'धर्मपुरी महात्म्य' या ओवीबद्ध ग्रंथाचा कर्ता विठ्ठलें ( शके १७५० ), गैबीदास ऊर्फ पंडितजी[१३]. कै.

११ महानुभाव तत्वज्ञान-डॉ. कोल्ते. पृ० ३७५,३७६, २८२
१२ 'धर्मपुरी महात्म्य'. ( हस्तलिखित ) अध्याय ८ वा.
१३ संपादक 'परमामृत प्याला' ( प्रकाशनः १९१५ )

अनुक्रमणिका

पांगारकर[१४], श्री. विठ्ठल रामकृष्ण ऊर्फ नानाजी ढोके[१५] इत्यादि विद्वानांचीहि 'अशीच समजूत झालेली दिसते. पण, ती चुकीची आहे. कारण, मुकुंदराजांनी हरीनाथांच्या आयुष्यांतील महत्त्वाच्या घटनांची जी विस्तृत माहिती 'विवेकसिंधूं'त दिली आहे त्या सर्व घटना त्यांचा जन्म, मौंजीबंधन, तपश्चर्या, यज्ञ, 'स्वयंज्योतीचें प्रकाशणें', हरिहरांचा संवाद, ब्राह्मणांची संज्ञाहीन अवस्था, हरीनाथांची निर्विकल्प समाधि, २२ दिवसपर्यंत झालेली त्यांची ब्रह्मावस्था, समाधि विसर्जनानंतरची उन्मन्यवस्था, रामचंद्रावर कृपा इत्यादि, 'वैण्येगंगातीरावरील' 'मणोहर अंबाणगरीं' लाच— म्हणजे हरिनाथांच्या जन्मस्थानींच घडून आल्या. 'तेथ प्रगटले श्रीहरी । जगदीश्वरु'॥ या ओवीवरूनहि तेंच व्यक्त होतें. हरीनाथांनी शंकराची तपश्चर्या वाराणशीला केली असती तर 'वैण्येगंगे'च्या तीरावर प्रगट न होतां शंकर वाराणशीलाच प्रगट झाले असते. आणि यज्ञस्थलीं शिवलिंगाची स्थापना करून त्याला 'चैतन्येश्वर' हें नांव देण्याची मुकुंददराजांना कांहीहि आवश्यकता राहिली नसती.

पुढील ओव्यांकडे जरा सूक्ष्मपणानें पाहिल्यास हीच गोष्ट लक्षांत येईल.

जैसा श्रीकृष्णाचा अवतारु । तेणें केला संदीपनी गुरु
मग वाराणसीसी भवानीशंकरु । तपें तोखविलें ॥ ४६ ॥

बारा वरुषें पाशुपत । तो आचरला महाव्रत
तेणें पार्वतीसहित । शंभू प्रसन्न केला ॥ ४७ ॥

नातरी दत्तात्रेय मुनेश्वरु । जो महाविष्णुचा अवतारु
तेणें प्रसन्न केला श्रीहरु । गौतमीतीरीं ॥४८॥ (वि. सिं. उत्तरार्ध; अध्याय ११.)

यांतील ४७ व्या ओवीचा अर्थ करतांना पांगारकरांची फसगत झालेली दिसते. ते म्हणतात-'काशीस जाऊन त्यांनी (हरीनाथांनी) बारा वर्षे पाशुपत महाव्रत केलें व शंकरास प्रसन्न करून घेतलें.* पण हा अर्थ या ठिकाणीं लागू पडत नाही. कारण लगेच मुकुंदराजांनी

तयाची परी अतिगहन । श्रीहरीने आदरिलें अनुष्ठान
तेणें तपतेजें त्रिभुवन । पोळते जालें ॥ ४९ ॥

ही ओवी योजून पुढे हरीनाथांच्या तपश्चर्येचें व यज्ञाचें स्पष्ट वर्णन केलें आहे. ४६ व ४७ या ओव्यांचा संबंध श्रीकृष्णाकडे व ४८ व्या ओवीचा संबंध दत्तात्रेयाकडे आहे. श्रीकृष्णाने महादेवाला तपाने प्रसन्न करून त्याच्यापासून वर मिळविले होते. (महाभारत; अनुशासनपर्व ४५-४६) त्याने पाशुपतदीक्षा घेऊन वाराणशींत तपश्चर्या केली होती व शंकराला प्रसन्न करून त्याच्यापासून वर मिळविला होता. (पद्मपुराण; स्वर्गखंड-३६). ४८ व्या ओवींत 'नातरी' (किंवा) हा शब्द सुरवातीला योजून मुकुंदराजांनी लगेच दत्त आत्रेयाचा दुसरा पौराणिक दृष्टान्त दिला आहे व त्यानंतर लगेच हरीनाथांच्या अतिगहन तपश्चर्येचें वर्णन केलें आहे. असो.

---

१४ मराठी वाङ्मयाचा इतिहासः खंड १ ला (मे, १९३२) पृ० ३९३.

१५ 'श्री आंभोरे क्षेत्र-महिमा (१९५०) पृ. १५.

* मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड १ लाः पृ. ६९३.

हरीनाथांनी काशीला तपश्चर्या केली होती ही पूर्वीच्या विद्वानांपासून तो १९५० साली प्रसिद्ध झालेल्या 'श्री आंभोरे क्षेत्र-महिमा' या ग्रंथाच्या कर्त्यापर्यंत प्रचलित असलेली समजूत कशी निराधार आहे हें वरील विवेचनावरून कळून येईल. आणि त्याबरोबरच हेंहि लक्षांत येईल, की हरीनाथांच्या आयुष्यांतील-जन्मापासून तों मृत्युपर्यंतच्या-बहुतेक महत्त्वाच्या घटना 'वैण्येगंगेच्या तीरा'वरील 'मनोहर अंबाणगरी'लाच घडून आलेल्या आहेत. ज्या 'जोगेश्वरी महात्म्या'च्या आधारावर मुकुंदराज हे आंभोऱ्याचे नसून आंबेजोगाईचे होत असें सिद्ध करण्याचा प्रयत्न श्री. कानोले व डॉ. तुळपुळे करतात[१६] त्यांतील सहा 'प्रसिद्ध' सिद्ध पुरुषांच्या यादींत मुकुंदराजाचें नांव यावें; पण 'महासिद्ध' हरीनाथांचा मात्र उल्लेखहि असूं नये यावरून मुकुंदराजाची अंबानगरी कोणती यावर स्पष्ट प्रकाश पडत नाही काय ?

## रघुनाथांचा स्थलनिर्णय—

हरीनाथानंतर त्यांची 'विशेष कृपा' ज्यांच्यावर झाली, त्या रामचंद्राचा—मुकुंदराजांच्या गुरूचा—क्रम येतो. रामचंद्र ऊर्फ रघुनाथ ( वि. सिं. उत्तरार्ध; ११–११५) यांच्या स्थलकालाबद्दल संशोधकांना कांहीच माहिती नाही. मुकुंदराजांनीहि आपल्या परमप्रिय गुरूच्या स्थलकालाबद्दल मौनच स्वीकारलेलें दिसतें. त्यामुळे बाह्य पुराव्याचा आधार घेतल्याशिवाय गत्यंतर नाही. वर उद्धृत केलेल्या पत्रावरून, कागदावरून आणि अभंगांवरून रघुनाथ हे शशिग्राम किंवा चंद्रनगर ( आजचें चांदा. आंभोऱ्यापासून सुमारें ५० मैल ) येथे राहत होते असें म्हणावें लागतें. शशिग्राम म्हणजेच 'चंद्रनगर'; आणि चंद्रनगरचें प्राकृत रूप 'चांदा'. रघुनाथांचें उपनांव बोबडे होतें. नागपूरचे कविवर्य कै० अण्णासाहेब बोबडे, त्यांचे बंधु सुप्रसिद्ध वकील श्री. भय्यासाहेब बोबडे, मराठींतील एक लेखक श्री. श्री. के. बोबडे, नागपूरच्या मथुरादास मोहता विज्ञान महाविद्यालयांतील प्राध्यापक श्री. मधुकरराव बोबडे, किंवा विदर्भांतील संतवाङ्मयाचें संशोधन करणारे श्री. रामचंद्र विठ्ठल ऊर्फ बाबाजी बोबडे या सर्वांचें घराणें मूळ चांद्याचेंच. चांद्याच्या बोबडे घराण्यांतील वंशवृक्षाची जी माहिती मिळाली, तिच्यांतहि मूळ पुरुष म्हणून रामचंद्रांचेंच नांव दिलेलें आहे.

वरील पत्रांत 'तपश्चर्येचे वेळीं......रघुनाथ ऊर्फ रामचंद्र हरीनाथास शरण आला' असें जें म्हटलें आहे तें खरें नाही. कारण, एकतर हरीनाथांनी वाराणशींत तपश्चर्याच केली नाही. अर्थात् तपश्चर्येच्या वेळीं, म्हणजे वाराणशींत, त्यांना शरण जाण्याचा प्रश्नच उद्भवत नाही.

बरें, आंभोरा येथे रघुनाथ हरीनाथास शरण आला असें मानलें तरी तें 'तपश्चर्येच्या वेळीं' नव्हे, तर तपश्चर्या पूर्ण होऊन, शंकराला प्रसन्न करून घेतल्यावर; बावीस दिवसांची ब्रह्मावस्था व त्यानंतरची उन्मन्यवस्था ओसरल्यावर; आणि 'हरीसी पूर्ण दृष्टि' प्राप्त झाल्यावर. ( वि. सिं. उत्तरार्ध; ११–९४).

हरीनाथांची 'असंख्य कृपा' रामचंद्रासच फळल्यामुळे तो नेहमी त्यांच्याबरोबर असे. हरीनाथांनी काशीक्षेत्रीं रघुनाथाचा मृत्यु चुकविला व ज्याने रघुनाथाच्या मृत्यूचें भविष्य

१६. म. सा. पत्रिका ऑक्टो.-डिसेंबर १९५०, महाराष्ट्र सारस्वत 'पुरवणी' पृ. ८४४ ते ८५१.

वर्तविलें होतें त्या मुकुंदभट्टालाच रघुनाथाकडून उपदेश देवविला. पण तो काशीला नव्हे, तर 'वैण्येगंगेच्या तीरीं' असलेल्या 'मनोहर अंबाणगरी'ला. रघुनाथांची समाधिहि आंभोरा येथेच असल्याचें मागील लेखांत आपण पाहिलें आहे.

रघुनाथांच्या स्थलनिर्णयांत चांदा, आंभोरा आणि काशी अशीं तीन ठिकाणं महत्त्वाचीं आहेत. रघुनाथांच्या 'जीवना'च्या दृष्टीने त्यांचा काशी येथील अल्प निवास अत्यंत महत्वाचा असला तरी त्यांच्या स्थलनिर्णयाच्या दृष्टीने चांदा आणि आंभोरा या दोनच ठिकाणांना महत्व आहे. चांद्यापासून ५० मैलांवर असलेल्या आंभोऱ्याच्या हरीनाथ महाराजांना ते शरण आले व त्यांनी समाधिहि आंभोऱ्यालाच घेतली. यावरून मुकुंदराजांनी उल्लेखिलेली 'वैण्येगंगा' व 'अंबाणगरी' कोणती हें अभ्यासकांना सहज कळूं शकेल. रघुनाथांनी 'स्वात्मसुख' नांवाचा संस्कृत ग्रंथ लिहिल्याचें एका लेखकाने नमूद केलें आहे.

### वैनगंगेचें प्राचीनत्व—

केवळ मुकुंदराजांच्याच नव्हे तर रघुनाथ व हरीनाथ यांच्याहि स्थलनिर्णयाच्या दृष्टीने वैनगंगेला कसें अनन्य महत्व आहे हें वरील विवेचनावरून कळून येईल. हरीनाथांचा सारा जन्म वैनगंगेच्या तीरावरच गेला. रघुनाथ त्यांना तिथेच शरण आला व त्या दोघांनी समाधिहि तिथेच घेतली. चैतन्येश्वराच्या स्वयंभू शिवलिंगामुळे तर या स्थानाचें महत्त्व विशेषच वाढलें.

वैनगंगेचें प्राचीन नांव काय असावें याचा विचार केला तर आपणाला वैदिक आणि पौराणिक कालाइतकें मागे जावें लागेल. श्री. चित्रावशास्त्री यांनी संपादिलेल्या प्राचीन चरित्रकोशाच्या पहिल्या खंडांत या नदीचें पौराणिक नांव 'वेणा' असें दिलें असून[१८] बलरामाने जी तीर्थयात्रा केली त्यांत इतर क्षेत्रांबरोबर 'वेणा'चेंहि नांव असल्याचें 'महाभारता'वरून नमूद केलें आहे.[१९] महाभारताच्या 'सभापर्वा'तहि या नदीचा उल्लेख 'वेणा' असाच आढळतो.[२०] पद्मपुराण[२१] (वेंकटेश्वर प्रेस) व मत्स्यपुराण[२१] (आनंदाश्रमप्रत १९०७) यांतहि या नदीला 'वेणा'च म्हटलेलें आहे.... भागवत[२२] व

१७ '१९०५ सालचा केसरी ऑक्टोबरचा अंक असावा.—नक्की आठवत नाही.' [ आद्यकवि श्रीमुकुंदराज लेखक—दिवाकर जयवंतराव चौबे, हिंगणघाट : मुमुक्षु मासिक, वर्ष ६. अंक ४ ].

१८ भारतवर्षीय प्राचीन चरित्रकोशः सिद्धेश्वरशास्त्री चित्रावः पृ. ६७५.

१९ महाभारत : शल्यपर्व, ३५-५५ चरित्रकोश. पृ. १६८.

२० 'स विजित्य दुराधर्षं भीष्मकं माद्रिनन्दनः । कोसलाधिपतिं चैव तथा **वेणा**तटाधिपम् ।
अ. ३१ श्लो. १२.

२१ गवामयुतमाप्नोति वायुलोकंच गच्छति । **वेणायाः** सङ्गमे स्नात्वा वाजेपयफलं लभेत् ॥
स्वर्गखंड अ. ३९, श्लो. ३२.

२१ रूपस्य भागीभवति सुभगश्चाभिजायते । ततो **वेणां** समासाद्य तर्पयेत्पितृदेवताः। स्वर्गखंड
अ. ३९; श्लो. ३०.

२२ तापी पयोष्णी निर्विन्ध्या क्षिप्रा च ऋषभा नदी । **वेणा** वैतरणी चैव विश्वमाला कुमुद्वती ॥
अ, ११४; श्लोक २७.

मार्कंडेयपुराण[२३] यांतील वेण्या ( किंवा ) वायुपुराणांतील वेण्वा, मत्स्यपुराणांतील वेणी[२४] व कूर्मपुराणांतील विन्ना[२५] हीं सर्व ' वेणा ' या मूळ संस्कृत नांवाचीं अपभ्रष्ट रूपें होत.

शिलालेखाचा पुरावा पाहिला; तर वैनगंगेलाच ' वेन्ना ' हें नांव असल्याचें आढळतें. नाशिक येथील शिलालेखांत ( नं. ४ ) गौतमीपुत्र सातकर्णी हा ' वेन्नाकटकस्वामी ' असल्याचा उल्लेख आहे.[२६] वेन्नाकटकस्वामी म्हणजे वैनगंगेच्या तीरावरील भागाचा राजा.[२७] खारवेलच्या शिलालेखांतील[२८] ' कन्हवेन्ना गताय च सेनाय... ' यांत उल्लेखिलेली वेन्ना, तिरोडीच्या ताम्रपटांतील वेन्ना; किंवा शिवनी येथिल द्वितीय प्रवरसेनाच्या ताम्रपटांतील[२९] ' बेण्णाकार्परभागे करंजविरकतटे ब्रह्मपूरकं नाम ग्राम: ' या वाक्यांत उल्लेखिलेली बेन्ना हें ' वेण्या ' या नांवाचेंच रूपांतर होय. हिलाच उद्देशून मुकुंदराजांनी ' वैण्येगंगा ' असें म्हटलें आहे. मुकुंदराज आंबे-जोगाईचे होत असें मानणाऱ्या कै. हरीभाऊ आपट्यांनीहि प्रस्तुत स्थलनिदर्शक ओवींत 'वैनगंगा' हाच शब्द वापरला आहे हें येथे सुचवून ठेवतों.[३०]

## संप्रदाय व मठ यांचें अनेकत्व

श्रीहरीनाथांच्या व मुकुंदराजांच्या परंपरेंतील कांहीं मठांचा उल्लेख मी मागील लेखांत केला होता. अशा कांहीं मठांतील हस्तलिखित ग्रंथांत हरीनाथ व मुकुंदराज यांच्याबद्दल पुढील माहिती मिळते.

खास आंभोरा येथील हरीनाथांच्या देवस्थानांत

ॐ नमो श्रीआदिनाथ । त्यापासोनी श्रीहरीनाथ ।
तेणें उपदेशिला श्रीरघुनाथ । तच्छिश्य श्रीमुकुंदराज महामुनी ॥......
तच्छिश्य...... ( इ. इ.... )

ही परंपरा दररोज म्हटल्या जाते.[३१]

---

२२ तुङ्गभद्रा कृष्णा वण्या भीमरथी गोदावरी...स्कन्ध ५ वा; अध्याय १९; श्लोक १८.

२३ क्षिप्रा पयोष्णी निर्विन्ध्या तापी च निषधावती । वेण्या वैतरणी चैव सिनीवाली कुमुद्वती ॥ अ. ५४ श्लो. २४.

२४ गोदावरी भीमरथी कृष्णवेणीच वञ्जुला । तुङ्गभद्रा सुप्रयोगा वाह्या कावेरी चैव तु । अ. ११४; श्लो. २८.

२५ तापी पयोष्णी निर्विन्ध्या शाघ्रोदेच महानदी । विन्ना वैतरणी चैव बलाका च कुमुद्वती ॥ पूर्वार्ध, अ. ४७; श्लो. ३४.

२६ 'Gupta Inscriptions' : Dr. fleet; P. 246.

२७ V. V. Mirashi : Journal of the Newmismatic Society of India; Vol. 2. P. 93-94.

२८ The Hathigumpha Inscription of Kharavela : Epi. Indica Vol. XX, P. 79.

२९ Dr. Fleet : Gupta Inscriptions : Page 246.

३० मराठी वाङ्मयाचा अभ्यास; पृ. १४.

३१ श्री आंभोरे क्षेत्र-महिमाः पृ. २८.

नागपूर येथील गणोबाच्या वाडींतील मठांत ' विवेकभास्कर ' नांवाचा एक ओवी-बद्ध ग्रंथ आहे (लेखनकाल, विक्रमसंवत् १८४७) त्यांत कवि म्हणतोः—[३२]

श्रीमत्‌छंकर श्रीहरि रघुपति वंदे मुकुंदोप्रभो......

नागपूरला तांडापेठेंत गळघाट्यांचा मठ आहे. तिथे श्री. बाबाजी बोबडे यांना दोन आरत्या मिळाल्या. त्यांतील परंपरा अशी—

( १ ) ...ओंकारपूर्ण ब्रह्म—स्वयं शीवची जाण । प्रसन्न करोनिया
हरीनाथे आपण । दिला कर शिरी परंपरा तेथून । रामचंद्र
निजभावे--तेथे झाला शरण.

( २ ) चित्सुखघननाथ हरीहर दीनबंधु—तेथुनी रामचंद्र केला सुखसिंधु...
करुणासागर मुकुंदराज प्रबोध--निजहित तारक केला मोक्ष सुखसिंधु

वर्धा जिल्ह्यांतील हमदापूर येथील मठांत

श्रीमच्चिद्‌घन आदिनाथ शिव जो पूर्णावतारी हरी
तेथोनी प्रभु रामचंद्र कर जो ठेवी मुकुंदा शिरीं...

ही आरती म्हटल्या जाते.

ही यादी आणखी लांबवितां येईल. व त्यांतच इकडल्या व खेडला येथील भागांत वैपुल्याने आढळणाऱ्या ' विवेकसिंधू ' च्या हस्तलिखित व छापील प्रतींची भर घातली तर हरीनाथ, रघुनाथ आणि मुकुंदराज हे कोणत्या भागांत झाले असावे व मुकुंदराजांनी उल्लेखिलेली ' वैण्येगंगा ' व ' अंबाणगरी ' कोणती असावी हेंहि अभ्यासकांच्या सहज लक्षांत येऊं शकेल.

---

३२ अध्याय ९०; श्लोक १.

# अन्वयस्थळ

लेखक : हरिबास व सोंगोबास

( संपादक : वि. भि. कोलते )

[ मराठी वाङ्मयाचा इतिहास लिहिण्याचें काम महाराष्ट्र साहित्य परिषदेने हातीं घेतलेलें आहे. हें काम जितकें साधार व अधिकृत होईल तितकें पाहिजे आहे. त्यासाठीं उपलब्ध असलेलीं साधनें अभ्यासकांच्या समोर मूळ स्वरूपांत येणें फार महत्त्वाचें आहे. याच हेतूने प्रस्तुत अन्वयस्थळ आज महाराष्ट्र साहित्य पत्रिकेंत प्रसिद्ध करीत आहे.

महानुभाव वाङ्मयाच्या इतिहासाचीं प्रमुख साधनें तीन. ( १ ) स्मृतिस्थळ; ( २ ) वृद्धाचार; व ( ३ ) अन्वयस्थळ. यांपैकी स्मृतिस्थळ व वृद्धाचार हा ग्रंथ श्री. वा. ना. देशपांडे यांनी संपादून पूर्वीच प्रसिद्ध केला आहे. त्याच्या अगोदर त्यांतील 'वृद्धाचार' हें महत्त्वाचें प्रकरण त्यांनी महाराष्ट्र–साहित्य–पत्रिकेंतच छापलें होतें. ( पहा. अंक ३६ ). वृद्धाचाराच्या मानाने 'अन्वयस्थळ' फार लहान आहे. तथापि, वहुतेक सुप्रसिद्ध महानुभाव ग्रंथकारांच्या ग्रंथांची माहिती त्यांत आलेली आहे; त्यामुळे त्याला विशेष महत्त्व आहे. एखाद्या महानुभाव ग्रंथकाराचें ग्रंथकर्तृत्व व ग्रंथलेखनकाल निश्चित करतांना या अन्वयस्थळाचा फार उपयोग होऊं शकतो. तसा तो आतापर्यंत अनेकांनी करून घेतलेलाहि आहे. या दृष्टीने हें प्रकरण अभ्यासकांसमोर मूळ स्वरूपांत येणें मला अगत्याचें वाटतें.

'अन्वयस्थळा' ला 'वृद्धान्वय' असेंहि म्हणतात. निरनिराळ्या आम्नायांचे स्वतंत्र वृद्धान्वय किंवा अन्वयस्थळें आढळतात. पण त्यांत सिद्धांते हरिबास आणि धाकुटे सोंगोबास यांचें अन्वयस्थळ विशेष प्रसिद्ध आहे. पूर्वी पारिमांडल्य आम्नायाचें अन्वयस्थळ श्री. ह. ना. नेने यांनी भारत इतिहास संशोधक मंडळाच्या त्रैमासिकांत ( वर्ष १७ अं. २. पृ. ५५ ) प्रसिद्ध केलेलें आहे. तें अर्थात् पारिमांडल्य आम्नायापुरतें मर्यादित आहे. सिद्धांते हरिबास व धाकुटे सोंगोबास यांच्या अन्वयस्थळाचें मात्र तसें नाही. यांत बहुतेक आम्नायांतील ग्रंथकारांच्या ग्रंथांची माहिती आलेली आहे. हें अन्वयस्थळ सिद्धांते हरिबास व धाकुटे सोंगोबास यांनी लिहिलें आहे. यांपैकी हरिबास हा धाराशिवकर ओंकारबासाचा शिष्य असून त्याला सिद्धांते हरिबास हें नांव अचल मुरारीबासाने कां ठेविलें यासंबंधीची आख्यायिका या अन्वयस्थळांतच आलेली आहे. तिन्ही स्थळांची रचना करण्याच्या कामीं गुजर शिवबासाला त्याचें बरेंच साह्य झालेलें दिसतें. या ग्रंथकारांविषयी स्थलाभावामुळे यापेक्षा अधिक माहिती या ठिकाणीं देतां येत नाही. प्रस्तुत अन्वयस्थळ अभ्यासकांना उपयुक्त वाटेल अशी अपेक्षा करतों. ]

॥ श्री परेशाए न्माः ॥ वृद्धाचार प्रारंभ ॥ शके ११८५ क्रोधनाम संवत्सरीं जेष्ठ मासीं सर्वज्ञें[1] झाडीऊनि त्रिजें केलें ॥ शके ११८६ क्षए संवत्सरीं कार्तिक मासीं प्रत्येष्टांनीं आबाइसीं[2] भेटि दीधली ॥ शके ११८८ विभव संवत्सरीं चैत्र मासीं श्रीनगरीं भटां[3] भेटि दीधली ॥ शके ११९० प्रमोद संवत्सरीं माघ मासीं खडकुलीसी भटां आनुसरण ॥ शके ११९१ प्रजापती संवत्सरीं चैत्र मासीं म्हाइंभटीं[4] भेटी जाली ॥ शके ११९३ श्रीमुख संवत्सरीं

१. श्रीचक्रधरस्वामी. २. आबाइसा = नागांबिका. ( ली. च. ए ७५ ). ३. भट = नागदेवाचार्य. ४. म्हाइंभट : लीळाचरित्र, गोविंदप्रभुचरित्र इत्यादि चरित्रग्रंथांचा संशोधक व संपादक.

वैशाख वद्य तेरसीं म्हांइंभटां आनुसरण ।। शके ११९३ श्रीमुख संवत्सरीं श्रावण मासीं आबाइसा देहेत्याग ।। शके ११९३ श्रीमुख संवत्सरीं माघ शुद्ध चौथीसीं सोमवारीं सर्वज्ञें त्रिजें केलें ।। १२०७।८ व्ययेनाम संवत्सरे वद्य चौथीसीं श्रीगोविंद–प्रभु सर्वज्ञें त्रिजें केलें ।। शके १२२३ शुभकृत संवत्सरीं भाद्रपदीं वद्ये द्वादशी आचार्यां ईश्वरदर्शन ।। आचार्या ३२ सा वरुषा आनुसरण ।। च्यारी वरुषे आमचिया सर्वज्ञाचें सन्निधान ।। त्यांत सा मास श्रीगोविंद-प्रभुचें सन्निधान ।। मग असन्निधान सोळा वरुषें ।। आनि १४ वरुषें श्रीगोविंद–प्रभु सर्वज्ञाचें सन्निधान ।। ऐसी सासटि वरुषें ।। त्यांत ३४ वरुषे लीळादानाचें आयुष्ये ।। छ ।।

आनुसरलिया मार्गिका च्यारि प्रमाणें : श्रुति : १ : स्मृति : २ : वृद्धाचार : ३ : मार्गरूढि : ४ : सर्वज्ञाचें श्रीमुख ते श्रुति ।। भटाचे वर्तमान ते स्मृति ।। रामेश्वरबास : परशरामबास : हारदमुनिबास : हीराइसें : नागाइसें : हा वृद्धाचार ।। ॐकारबास : धारासिव : अचळमुरारीबास : सिद्धान्ते हारीबास : गुजरसिवबासापर्यंत मार्गरूढ : मग ऐलाडी काही जीवहेतु संचरला म्हणौनि हे च्यान्ही सकळ मार्गासि प्रमाणें ।।

भटां विद्येमान केसोबासीं : पूर्वी : १ : पंचकृष्ण : २ : नवहि प्रकरणें : ९ : ऐसीं ११ आनि आचार : २८९ दोन शतें न्याहासी वचनें : १२ : आनि विचार २८५ दोन शतें पंच्यासी वचनें : १३ : आनि द्राष्टान्तीक सहीत श्रीमुख दृष्टान्त : ११४ : एकशत चौदा : १४ : ऐसी चौदाही श्रीमुख–प्रकरणासी अन्वयो लावूनि आचार्यां दाखवीला : तो भटीं मानीला : ।। : मग लापिणीक : दृष्टान्त बोलिले : आन श्वशुरेनि नेलं होतें तैं रत्नमाळा दोन्हीं रुपें लीळा केलिया : तिया आचार्यां दाखविलीया : मग भटीं हणवन्तवाडा हे चुकी दावूनि देऊळवाडा घालउनि प्रशंसिलीया : ।। म्हणौनि मग संस्कृत दृष्टान्त केले : आचार्यां दाखविले : भटीं म्हणितलें : हें बरवें केलें : परी माझी वेडी नागडीं आईबाई नागवैल : म्हणौनि मग आवघीं संस्कृतें प्रकरणें करूं राहीले : मग ज्ञानकलानिधी स्तोत्र केलें : ।। छ ।।

एक वेळ भटांचिया दर्शना नाथपंथी जोगी एक आला : तेणें म्हणितलें : नाथ जाणा ? : भटीं पंडीताची वास पाहिली : मग पंडीतीं म्हणितलें : तुम्ही जाणा : तेहीं म्हणितलें : हो : बोला पां : ते बोलिले : मग पंडीतीं[2] आक्षेपीले : मग " नवनाथ कहे सो नाथपंथी " हे चौपदीं पंडितीं केली : तो खंडीला : मग प्रस्तावयानुरुप एकैके काळीं ६० साटि चौपदीया केलीया : मग भटीं म्हणितलें : पंडीता : केसवदेया : तुम्ही माझे डोळे गा : म्हणौनि प्रशंसिले : मग केसोबासा अविद्येमान त्याचेनि वियोगदुखें पंडीतीं वत्साहरण केलें : केसोबासाचें नाम सख्यत्वें मांडिलें असे : ' मंगळमुर्ती : भक्त दृष्टी निहाळीती : ' हे नवापदाची आर्ती : आनि मग राधिपुरिचिया लीळाचें स्तोत्र : ' प्रातः सुप्तोथितः ससवळीत मळयबह : सा ६ : आन नामावळीस्तोत्र नव श्लोक केले ।। छ ।।

हृदय भज परेशं स्वामिनं चिद्वाख्यं : नएननिखिललोकाधारमालोकयशन् ।। श्रवण श्रुणि तातं पुन्ये किर्ती महातं : भवगदुसुमनं तं वानित्वं वर्णयासुः ।। १ ।। हा श्लोक प्रथम भेटीसी श्रीगोविंदप्रभु सारंग पंडीतीं ओळगवीला ।। छ ।।

' उधातु परिमळ ' हे आरती आकाइसाचीया रामदेवाची ।। छ ।।

---

१. नागदेवाचार्य. २. पंडित – दामोदरपंडित; वत्साहरण काव्याचा कर्ता.

सकळा मंगळाची होए जइ वृष्टी : नित्या मातें अ : १ ॥ : परम मंगळ जया : परमपावन जथा : २ ॥ जएजएकारीं मंगळ उचारीं ॥ ३ ॥ परिएळीं आरतिया उजळालिया ॥ ४ ॥ नारद तुंब्रर विणा वाती ॥ ५ ॥ भुजंग जीणौनि आले मुरारी : ६ ॥ परसरामें जो केला आचारी ॥ ७ ॥ जयाचि आवस्था तो पैं भेटला ॥ ८ ॥ सकळ सिद्धान्ता अगोचरा ॥ ९ ॥ जए मंगळ मंगळा ॥ १० ॥ ऐसिया दाहा आरतिया : आन चरणशरणपारं (इत्यादि) ऐसे पाच : ५ : आनि धवळ म्हाइंभट : संबंधुनि महदाइसेतें सांघति तो श्रीगोविंदप्रभुवरि गावविला आन तिन्ही रुपें चरित्रें म्हाइंभटींचीं केली परी ते लीळा संबंध आन थोरले उंब्रर-वटाचें पात्र : आन थोरला दाढेचा विशेष : आन चौथा भाग वस्त्रेप्रसाद ऐसें वाचासुंदर बोल्हाइसा सहीत खालसाचिया धाडीसी नाहीचि जाले : दाढेचे विशेष परसरामबासीं चारी : ४ : केले : तैसेचि वस्त्रेप्रसादाचेंहि चारी भाग क्षेपनशीला पुरुषा आलंबन म्हणौनि : थोरला दाढेचा विशेष आन एक भाग प्रसाद : वाचासुंदर बोल्हाइसासी दीधला : जो गेला तो आन भटो उपाधिब्रासासी दादो म्हणती : त्याची धाडी कमळाइसें आन शिष्येहि म्हणति : भटी संपादिली : यातव वडिले उपाध्ये कमळाइसें म्हणौनि दाढेचा धाकुटा विशेष आन नखाचा विशेष हे दोनी आन एक भाग वस्त्र—प्रसाद कमळाइसासी दिधला : मग दाढेचा विशेष तो धारासिव ओंकारबासाचिया एल्हाइसें : १ : पद्‌माइसें : २ : जोमाइसें : ३ : नामाइसें : ४ : या चौघे बाइया गुजरसीवबासाचिया भेटी जालेया दाढेचा विशेष आन सोळा स्थंडीलें प्रसाद सीवबासापासी ठेवुनि आटणा गेलीया : ते काळीं दोघीं बाइया देवासी पावलिया : दोघीं आलिया : मग दुसरेन तियाहि अटणा मागुतिया गेलीया : कापुराची असती परि आइकौनि : मग दाढेचा विशेष आन सोळा स्थंडिलें प्रसाद गुजर सीउबासापासींची राहिला : आन नखाचा विशेष तो पांचवी ओंकारबासाची सोनाइसें त्या पासी राहिला : आन उरला वस्त्र-प्रसाद तोही आन दाढेचा विशेष आन तीसरा भाग वस्त्रे-प्रसाद ऐसे कवीश्वरबासाचा[1] धाडी नागाइसासी दिधला : तो गुजरसीवबासाचिए पीढीसी आला : धाकुटा एक विशेष आन कापुराचें सेंद आन चौथा भाग वस्त्र-प्रसाद कुमर रेमा-इसासी दिधला : आन साध्वी देहांती परसरामबासा दाढ आन डोंब्रे उंब्ररवटाची गांठी दिधली : आन एक डोंब्रेग्राम उंब्ररवटाची पातुरली : चक्रपाणी आमुनाइं दिधली : मागा भटाचेनि नांवें भिक्षा केली म्हणौनि कवीश्वरीं चक्रपाणीब्रासासी दिधली : हे महेश्वराचे पुत्र : दुसरी ते काई जाली तें नेणीजे : म्हाइंभटाचा लीळासंबंध गेला म्हणौनि मग कमळाइसाची हीराइसी तीन्ही रुपें लीळा शोधिलीया : त्यासी एकसंदी प्रज्ञा होती म्हणौनि : मग त्याचि लीळा-अधारें तिन्ही रूपें चरित्रे आदि : परसरामब्रासीं केलिया : मग आर्थ वचनें १०० : एक शत आचार : स्वातंत्रिएचें प्रकर्ण : आन १४३ वचनें विचार : ज्ञानमोचकाचें प्रकर्ण काढिलें : आन निर्वचन प्रमए : आन तेथीलचि अस्तीपरी : आन चैतन्ये मृत्तीका उद्धरणी-चिया १२ वचनांची : तथा दृष्टान्त प्रमए आन मूर्तीज्ञान थोरलें : आन आचारविचार प्रकर्ण बोलिले ॥ छ ॥

आन बहुतामध्ये हें प्रकरण आचार १५४ एकशत चौपन्न आन शोधक हें साटि वचने विचार हे रामेश्वरब्रासी त्याचि लीळाआंतु काढिलीं ॥ छ ॥

आन देउळवाडेकार लक्ष्मींधरीं ज्ञानकळानिधीस्तोत्र केलें होतें तें भटीं विरहीयाचि

---

१. कवीश्वर = भास्करभट्ट बोरीकार–शिशुपालवध, उद्धवगीता इत्यादींचा कर्ता.

आंतःकरणें जातील म्हणौनि तापत होते त्याचि सगडी आंत घातलें : मग पाथरापाशी बाबुळगांवीं ज्ञानभास्कर स्तोत्र केलें ॥ छ ॥

आन कवीश्वरबासीं निर्वचन-स्तोत्र केलें : १८ श्लोक : आन २७ पुजाआवस्वर श्लोक : आन ३९ प्रस्तावा श्लोक : आन नरविलाप स्तोत्र आन 'नीलांभोजस्फुटतररुची-शिखी'. हे आवतार-शट्क आन गद्यचाली सातपांच श्लोक : आष्टक तीन : त्यांत श्रीयाष्टेके संस्कृत आन ऋद्धीपुरीचे श्लोक ४० आन वोवी-बंध शिशुपाळ केला : तो भटीं निराकरीला माझेया विरक्तां योग्य नव्हे म्हणौनि : मग रामदरा एकादशस्कंद केला : ऐसे बारा बंध केले : एक म्हणती बाइदेवबासीं म्हणितलें : ॥ छ ॥

आन पारमांडल्ये आनोबासीं ३२ शास्त्रलक्षणें संस्कृतें आन आन्ताक्षेरी बोलीली ॥छ॥

आन त्याचाचि शिष्यीं वासुदेवभटीं कवीश्वरां प्रश्न करणें ॥ छ ॥

आन धाकुटीं हएग्रवबासीं प्रत्येस्थानी गद्यें केलीं : ॥ छ ॥

आन भटाचा राघोबासी पुजावस्वर द्वादस श्लोक केले : आन गीतेची टीका : आन पूजावस्वर साटि : ६० : वोवीबंध केला : ॥ छ ॥

नरेंद्रबासीं नरेंद्र ग्रंथ केला । ग्येत्रहारीं देवगीरीसी : ॥ छ ॥

ज्ञानप्रबोध गुजर सीवबासाचा वीसोबासीं केला : सस्ती वांडेगावीं ॥ तत्काळींचि अचळ मालोबासाचा शिष्यीं वाहाळे नारोबाशीं रुद्धिपुर-वर्णन वेळें : आन वेली : डंक : गारुड साइलो : जुरट : फुलेतें बरवी हे आरती : ॥ छ ॥

अचळाचा दाएंबासीं : मंगळमुर्ती कृष्णा मंगळनिधान : तुमचे चरण चिंती । हे आरती : आन निर्वेद आन सांचै सए हे भरवसेचे अकरा ११ : आन एकतीस ३१ श्लोक गद्यरूप केले : ॥ छ ॥

भटाचा पुत्रीं महेश्वरीं रुद्धिपुर-माहात्म्ये : आन निर्वेदु केला ॥ छ ॥

हीराइंसाचा रवळोबासीं सैह्याद्र-वर्णन ग्रंथ : आन नामाचे १० ठाए : आन नागर लिपी : ऐसे केलें : ॥ छ ॥

धारासीव ॐकारबासीं स्मृती केलिया आन विगोवाही : ॥ छ ॥

आन त्याचाचि शिष्यीं सिद्धान्ते हारीबासीं पाठसमुदाया आंतुलें तीन्ही पूजावस्वरें केले : आन आठा दृष्टान्ताची प्रमए आन आर्ध आर्धपानावरी जीवमूर्तीज्ञान आन प्रसादसेवा ऐसी दोनी प्रमएही केलीं : आन आनोबासाचें मेयावा : कवीश्वराचे रामेश्वरबा परसरामबासाचिया वासना मांडिलीया : आन शोधीचें तीसरें लक्षण आन दृष्टान्ती : धारासीव ॐकारबासाचा आर्थ म्हणौनि बासपक्ष शोधुनि मांडिला : ॥ छ ॥

कवीश्वराचा नागाइसीं दुसरी लक्षणें : आनि माळिका आन सय्यापालना आन दुर्भगा हे ग्यान्ही प्रमए केली : त्यात माळीका दार्यी भागवतीं दवडीलिया : ॥ छ ॥

राजुर लक्ष्मीधरीं भटातें पुसपुसों लक्षनें केलीं : ॥ छ ॥

नांदेडकर मुनीबाशींहि माळीका बोलीलिया : तियाहि काइ जालीया ते नेणिजेति: ॥छ॥

कमळाइसाचा हारद मुनीबाशीं माळीका केलीया आन अमुर्त मुचले मुर्तज्ञानही : ॥छ॥

आनि कुमरमुनीबासीं माळीका केलीया : तिया दोन्हीं मार्गीं आलीया : ॥ छ ॥

---

१. गद्य = गद्यराजस्तोत्र हें काव्य.

माहावाक्ये प्रमए आन तेथीऊनि अस्तीपरी आनिक पांचा पूर्वीयाचें मुर्तीज्ञान आनिक प्रसादसेवा थोरली : आनिक स्वमति संसरण : आनिक दुसरा पिढीपाठ चरित्राचा सकळ पाठ शोधुनि अचळा सीवबासीं केला आन शोधुनि मांडीला : ।। छ ।।

कापुराची अस्तिपरी दुर्योधन निमित्तें अचळ मुरारीबासीं केली : ।। छ ।।

विधाएक दृष्टान्त ५५ : आनिक बल्हो आत्मज्ञानाचा : संनिधानाचा : आनिक ग्रहणादानाचा : आनिक संसरणाचा : ऋषिशृंगाचा ऐसे ५ वल्हो : परी वल्हो आंत काही क्षेपकहि असे : आन वर्त्तविहार ऐ सात ७ पेटे हारीबासीं केले : ।। छ ।।

पुल्होबासीं दृष्टांत–प्रमए केले : ।। छ ।।

एक दृष्टांत–प्रमए : आन हेतुस्थळ हे कमळाइसाचिया पोमाइसाचिया न्यायाबासीं केलीं : ।। छ ।।

धाकुटे मुर्तीज्ञान आन प्रसादसेवा ऐसें एकत्र तीचौ पानावरी असे : आन एक वृक्ष तीन खांदीया ए चौपदीची टीका : आन पुजावस्त्वर श्लोक ऐसे बीडकर मधोबासीं केलीं ।।छ।।

आनिक पारमांडल्ये आनोबासाचा शिष्यीं नागोबासीं तीसरा नागनाथ पाठ चरित्राचा बोलिला : ।। छ ।।

आन वडील दत्तोबाबास तळेगावकर दो पानावरी मुर्तीज्ञान बोलिले : ।। छ ।।

आन मल्हेकोयाबासीं साठ श्लोक गद्यचाली : पुजावस्वर केले : ।। छ ।।

अचळ मुरारीबासीं धारासीव ॐकारबासापाशीं रळ विकावेया पाठविले ते ॐकारबासीं रळ विकुनी द्रव्ये अचळासी पाठविले : परी अचळाचा आन्तरीं विकल्प वाटला : जे ॐकारबासीं कांही द्रव्याचा आभिलास केला : ते ॐकारबासीं आयिकिलें परि धैर्ये आन्मोद केला : जरी मग कालान्तरे पाथरिसीं कवीश्वराम्नाइचा आइ : वोवी अचळा वरी गाइली ऐसि जे : अचळा वरी वोवी : गाइली सुंदरी : अभिलास तोडरी : मुरारीचा ।। १ ।। तव तेथे उपाधि आम्नाइचिया आइया होतिया : तीहीं ही ॐकारबासावरी वोवी गाइली ऐसी जे : अभिळासाचा मळ : न लगे अळुमाळ : तो ॐकार निर्मळ : जाण सए ।। २ ।। हे वोवी अचळबासीं आइकिली आनि आनिक अन्तरांचे विषमत्व सर्वेची गेले : मग त्याचि नंतरें अचळबास ॐकारबासाचिया भेटीलागे धारासीवासी गेले : परस्परें भेटीकाळ समाधान जाला : दोघे उभए आम्नाइचे आचार्ये : सकळ मार्ग या दो आनुसंगीक : एकदी दोघे माहानुभाव बैसले आसतां अचळीं म्हणितलें : तुमचिया हारीबा आमचिया सीवबासीं कांही शास्त्रार्थ बोलवुनि पाहा पां : मग सविबासि म्हणितलें : बा हारबा : तुम्ही होते प्रतिष्टा : आपण नव्हते प्रतिष्टुं : मग हारीबासीं म्हणितलें : तुम्हा स्वोक्ति यासी बोलोचि नए : मग आचळीं म्हणितलें : हा सिद्धान्ते हारीबा म्हणा : म्हणौनि नाम ठेविलें : मग ॐकारबासा : आनि अचळबासा अविद्यमान सिद्धान्ते हारीबासीं मग गुजर सीवबासीं आवघीया टांचणीया मेळवुनि दोघीजणीं पाथरीसी तिन्ही स्थळाचा संबंध केला : तियाचि टांचणिया : म्हाइंभट : १ : उपाधिबास : २: आनोबास पारमांडल्ये : ३ : राजौर लक्ष्मीधर भट : ४ : कवीश्वरबास : ५ : दंते गोपाळबास : ६ : अमृते मायाबास : ७ : कमळाइसें : ८ : कुमार रेंमाइसें : ९ : नाति नागाइसें : १० : धाडी नागाइसें : ११ : हीराइसें : १२ : हारद मुनिबास : १३ : परसरामबास : १४ : रामेश्वरबास : १५ : धारासीव ॐकारबास : १६ : कुमर मुनीबास : १७ : पेटे हारीबास : १८ : पाटकुळे मालोबासाचि आबाइसें खांबणीकरें : १९ : पातुर ॐकारबास : २० : ऐसिया वीसा आंन आपण दोघैजण ऐसे : २२ : आन फरपटेचा पक्ष तो तेवीसावा : २३ : परि तो कवणाचा हे नेंणिजे : आन नांदेडकर मुनीबास : २४ :ऐसा चोविसा पक्षी

तिन्ही स्थळें संबंधीलीं ॥ उपाधिव्रासाचिया आन आनोव्रासाचि दुरेघीया : सर्वज्ञापासौनि उपाधिव्रासा बोध : आन आनोव्रासावर जे भविष्ये ज्ञान सांघीतलें : मग भटापासौनी व्रोध : मग भटातें मागे आनोव्रास अनुसरले म्हणौनि दुरेघीया मांडिलीया ॥ २॥ राजौर लक्ष्मींधराचें लक्षण : दुरेधि आन दोहीकडे मेळविलें : मुद्रित सिद्धान्त म्हणौनि मांडीले ॥ ३ ॥ विश्वमहं : प्रकृतिरहं हे संस्कृत शब्द न कळती : मग कवीश्वरीं व्याकरण पढविलीयावरी लक्षणें केलीं : म्हणौनि तें दुसरें धाडी नागाइसाचें लक्षण दुरेधि आन मध्ये मेळविली : कांहीं स्पष्ट कांहीं झांकला आर्थ म्हणौनि मांडिलें ॥ ४ ॥ कुंमर रेंमाइसाची रेषा एकी : एकी कुमरत्व म्हणौनि ॥ ५ ॥ मग एकी रेषा आवछेदार्ची। झांकला आर्थ म्हणौनि घोंगडे आमृते मायाव्रासाचे मांडिले : दोन रेषा आन : दुरेघी : मेळवीलिया ॥ ६ ॥ उभी रेषा आन दोहीकडे आडवीया रेषा तो स्तंभ पेटे हारीव्रासाचा : अढळ सिद्धान्त म्हणौनि । आन संन्निपात काळींचा आर्थ तो ईश्वरें सांचवुनि सांघाविला म्हणौनि आंकुश मांडविला : ॥ ७ ॥ दुसरा स्तंभ : उभी रेषा : आन दोहीकडे सुन्ये वाटोळी तो पाटकुले मालोव्रासाची आइवाइसें खांबनीकरें : ज्याचे खांबनी नागोवास : गुरूचा अविद्येमानीं वियोग निढाळपणें वैद्य दत्तोव्रासासी दंडवत घातलें : त्या आवाइसाचा : ॥ ८ ॥ आंती हे माळिका ऐसें असें ते कुमर मुनीव्रासाची ॥ ९ ॥ आन आरंभी माळिका : तथा माळीका : सरळ अनुक्रमणीका म्हणौनिया बोळखी : कमळाइसाचिया हारदमुनीव्रासाचिया मांडीलिया ॥ १० ॥ आन फ़ुली ते कमळाइसाचिया हीराइसाची : अर्थमर्यादा म्हणौनि मांडिली ॥ ११ ॥ आन दुसरी मध्ये ते आवच्छेदाची स्वमती ते शिवव्रासीं आपुली मांडिली ॥ १२ ॥ आन शोधीचें लक्षण आन चौरेघी ते सिद्धान्ते हारीवासीं आपुली मांडिली : कमळा-इसापासौनि चौथे मानोत्तर म्हणौनि : आन म्हांइभंट १ : कवीश्वरव्रास २ : दंते गोपाळव्रास ३ : कमळाइसें ४ : नातिनागाइसें ५ : परसरामव्रास ६ : रामेश्वरव्रास ७ : धारासीव ॐकारवास ८ : पातुर ॐकारबास ९ : नांदेडकर मुनीव्रासीं माळीका केलिया उपरी : टांचणी एकी होती तिएचा पक्ष म्हणौनि १० : आन फरपट ११ : अकराचिया स्पष्ट संज्ञा मांडिलीया : ऐसा चौवीसा पक्षी : तिन्ही स्थळाचा बंध : सिद्धान्ते हारीव्रासां आन गुजर सीवव्रासा मिळौनि पाथरीसी केला : मग हिराइसाचिया रवळोबासाचि नागरलीर्पी लिहूनि दोन प्रती केलीया : एकी सीवव्रासीं घेतली : ते आपुलिया आंकलिर्पी लिहीली : ते त्याचीए पीढीसी पडिलीं : तीचा उपयोग मार्गासी जाला नाहीं : सीवव्रासाचा वियोगीं दत्तोव्रास आनुसरले म्हणौनि । शिववासाचीं शिष्यें रुपाइसें : वैद्याची बहीण त्याचा हातीं सकळ शास्त्र दीधलें : बीसोव्रासाचेनि रागें : जे दत्तू अनुसरेल तरी त्याचा हातीं द्यावें म्हणौनि आन रवळोबासाचा नागरलिर्पी लिहुनि सिद्धान्ते हारीबासीं घेतली : ते प्रति पाटकुले मालोव्रासांच्या तुकाइसाचे वडील सिष्ये परंडे नागोव्रास त्यासी सिद्धान्ते हारीबासीं निरोपीलीं : मग परंडे नागोव्रासीं आपुलियार्थी आन कपाटे नागोवासासीं निरुपीलें म्हणौनि : ते नागरलीपीची प्रती : तथा अर्थान्वर उभए आम्नाइं मार्गासी आला ॥ विस्तारला ॥ ऐसें हें शास्त्रे सकळमार्गा प्रमाणयुक्त आन्वइक जांणावें : यावेगळें आर्थ : आर्थांतर : प्रमए : चरित्रादीक तेतुलेहि क्षेपकचि जाणावें : हिराइसाची शोधनी मुळ : मग शिववासाचा पीढीपाठ : आन पारमांडल्ये आम्नाइं आनोव्रासाचिया नागनाथाच्या पाठ : ऐसिया तीन : तिही रुपाचिया चरित्र सोधनीया : सर्वांसी प्रमाण : एर काहीचि प्रमाण नोहे : क्षेपक जाणावें : का पां : क्रांतदर्शी पूर्वजीं एथार्थ ईश्वर हेतु तोचि घेतला : एर नाही घेतलें म्हणौनि : इतुका साधकीं बाधकी अवांतरहीं प्रमइ आर्थानिर्णए तो प्रमाण : एर अप्रमाण जाणावे : ॥छा॥

आता जुनेचि अपमाण पंथ जाले : तोचि कवण : कवीश्वरबासाचे व्येंन्हाराचे गुरु

केशवाचार्ये : ते नदीसी स्नान करीत होते : तंवं कवीश्वरावार्सा मेधंकरापाशी : बोरीचे त्यागिए। आनुसरले : अटण करीता नदीसी उदकासी गेले : उदकपात्र भरिलें : मग केशवाचार्यी म्हणितलें : बोरीकर भानु : मज नमस्कारु न करीसी तरी काइ तुज त्रितीए सिंग निगालें : मग कवीश्वरीं म्हणीतलें : व्हो त्रितीए षिंग निगालें कीं नाही हें आनुभवें जाणावें : मग दोघां चर्चा प्रवर्त्तली : कवीश्वरीं निरुत्तर केलें : मग केशवाचार्यी म्हणितलें : भानु : तरी मज काही आपुर्वं साघ पां : कवीश्वरीं म्हणितलें : आमुचिया गुरुपासी चाला पा : भटाजवळी आणीलें : भटातें कवीश्वरीं विनवीलें : भटीं म्हणितलें : कवीश्वरा : श्रीचक्रधरांरायाचे दारवंठे नुघडितिचि गा : कवीश्वरीं त्रिसुद्धीं ममतेंतव भटातें विनवीलें : जें भटो मजलागी इतुकें करावेंचि : मग भटीं कवीश्वराचिया भीडाची काही एक बोलिलें : आनुसरले : परि मग जें निरूपण तें आपुलेया वेदांतासी मेळाविती : म्हणति भटातें : आमचां वेदीं वेदांतिकीही ऐसेंचि असे : संकराचार्यांचा पंन्चकरण माहावाक्यींहि ऐसेंचि बोलीलें असें : भटीं म्हणितलें : जळो जळो तुझें ज्ञान : सर्वज्ञें तव मजप्रति ऐसें बोलिलें असें : म्हणौनि सिक्ष्यापिति : परि जें निरूपण तें आपुलेया अवबोधासीचि मेळवीती : मग भटीं बाहीरि घातलें : मग तिहीं सिस्यें केलीं : मुर्तीप्रकाश ग्रंथ केला : आन त्रंशापरता परमेश्वर : भावरूपां जडाशक्ती : अपर १ : अवर २ : पर ३ : परावर ४ : ऐसे चारी भेद केले : ऐसा एकबंध प्रमए केले : मग तेंचि दुसरेनि शोधिलें : ऐसे दोन्ही प्रमयाचें बंध : तयाचे वडील शिष्ये कान्होबा : ते केशवाचार्ये म्हणवीति : त्यापासी होते : मग केसवाचार्या अविद्येमान मागे शिक्ष्यापीले : मग मार्गासी मिळुनि होतें : परि ते आपुलिया गुरुचें म्हणितलें टाकीलें नाही : मग त्या कान्होबाचे सिष्ये वायाबा : तयाचे आहाबा : तयाचे दत्तोबा : त्याचा हारीबा : त्याचा विठोबा : त्याचा गोंदोबा : आठवा तो गोंदोबा तळेगावकरा विनाएकबासापासी दाहा सहस्राचा तळेगावीं निवर्त्तला : तेथ ते दोन्ही प्रमयाचीं पुस्तकें राहिलीं : प्रथम आनोबांस पारमांडल्यें त्याचीं बानाइसें : त्याचे हारबास : त्याचे दत्तोबास : त्याचे गोंदोबास : त्यांचे उफांधे चाह्याबास : त्याचे विनाएकबास : विनाएकबासाचा अविद्येमानीं आठवा मानोत्तरीं तेथुनि तळेगांवकराचा पहिलीया खरडियापासौनि तदाधार अभाव बोध भिन्न प्रवर्त्तला : ॥ दुसरें शोधनीचें पुस्तक तें गोदातिरीं सेगांवीं तळेगांवकरांचा मग भांबारीचा मठी राहिलें : लिहावेया नेलें होतें : मग ऐसा आन्वए परि जुनाचि म्हणौनि प्रतिष्ठेतें पावला ॥ छ ॥ आन रुद्रपुरीहुनि जो नाथपंथिया जोगी म्हांइंभटीं बाहीरी घातला तो सैह्याद्रासी गेला : अभीमाने दत्तात्रयो देवासी वर मागीतला : जें मी करीन तें सिद्धीतें नेयावें : मग दत्तात्रएदेवी वरु दीधला : एथा संकराचार्ये शके सा सते चेताळीस वरुषे शालीवाहान शकीं घाटी वेष प्रतिष्टीला : मग तेणें नाथपंथिए स्त्री केली : पांच पुत्र जाले : मार्गी आइबाइ ठकुनि कांहीं शास्त्रें सिकीला : तें त्या पांचा पुत्रासी सिकविलें : तयाचीं नामें आनंदमुनी १ : अलम प्रभु मुनी २ : ब्रह्मज्ञान मुनी ३ : उपरमुनी ४ : शाक्तेमुनी ५: या पांच पुत्रापासौनि पांच पंथ जाले : तेचि कोण कोण पा : आनंदमुनीपासौनि आनंदवोळी: आलंब प्रभु मुनीपासौनि आलम प्रभु : ब्रह्मज्ञान मुनीपासौनि ब्रह्मज्ञानी : उपरमुनीपासौनि उपरिए : हे प्रासिद्ध आसत : आन शाक्तएमुनीपासौनि अघोरशक्तीउपासक : चोळका पंथ हे दोनी मार्ग जाले : तरि मद्य मांस परस्त्री व्येभिचार : घटपुजन ऐसे सर्व मुक्त असे : यंत्रपुजा प्रधानत्वे आचार : ५ : ऐसे पांच पंथ जाले ॥ छ ॥

हे आन्वएस्थळ धारसीव ओंकारबासाच्या सिष्या सिद्धांते हारीबासीं धाकुटे सोंगोबासीं संबंधीलें पुढे भविष्ये विचित्रता जाणवुनि : ॥ एवं आन्वएस्थळ संपूर्ण समाप्त ॥

---

# परीक्षणें

**आधुनिक मराठी कविता : ( लेखक : प्रा. भवानीशंकर श्रीधर पंडित, एम्. ए. सुविचार प्रकाशन मंडळ लि. नागपूर १. किंमत पांच रुपये ).**

निबंधमालेच्या जन्माला आता ८० वर्षें होत आलीं. व्यवहारदृष्ट्या या काळांत तीन पिढ्यांचे संसार पार पडले असले तरी वाङ्मयीन दृष्टीने या काळाचे स्पष्ट चार खंड पडतात. पहिला, इंग्रजी वाङ्मयापासून स्फूर्ति घेऊन मराठी वाङ्मयाला नवें वळण लावणाऱ्या प्रतिभाशाली प्रवर्तकांचा. (१८७४--१९००). दुसरा, त्यांच्याच पावलावर पाऊल टाकून आपल्या प्रतिभेने तो प्रवाह परिपुष्ट करणाऱ्या सामर्थ्यशाली संवर्धकांचा. (१९००-१९४०). इंग्रजी अंमल आणि इंग्रजी वाङ्मय यांचे परिणाम असे सतत दोन पिढ्या आपल्या सामाजिक जीवनावर झाले. त्यांत पहिल्या महायुद्धाने (१९१४-१९१८) निर्माण झालेल्या परिस्थितीची भर पडली. त्या युद्धाने जगाची केवळ आर्थिक घडीच विसकटून टाकली नाही, शास्त्रीय शोध मनुष्याच्या विकासाइतकेच विध्वंसालाहि कारणीभूत होऊं शकतील अशी भयंकर शंका त्याने मानव जातीच्या मनांत निर्माण केली. या महायुद्धाने युरोपांतल्या सामान्य मनुष्याच्या संसाराला अवकळा आणली, त्याच्या जीवनमूल्यांच्या बाबतींत नवी पोकळी निर्माण केली. या साऱ्या विकलतेची, उध्वस्ततेची आणि अगतिकतेची प्रतिबिंबें इंग्रजी वाङ्मयांत १९२० नंतर स्पष्टपणें दिसूं लागलीं. भावना, विचार, श्रद्धा, मूल्यें इत्यादिकांचें केवळ मंथनच नव्हे तर भंजनहि त्या काळांत सुरू झालें. १९२०-४० या कालखंडांतल्या आपल्याकडील वाङ्मयांतहि या खळबळीचे प्रतिध्वनी उठले. मात्र सामाजिक व वैचारिक बाबतींत आपण युरोपच्या फार मागे असल्या-मुळे ते प्रतिध्वनी स्पष्ट ऐकूं यायला दुसऱ्या महायुद्धाचा कालखंड उजाडावा लागला. त्यानंतरच्या गेल्या तपांतलें आपलें वाङ्मय बाह्यांग व अंतरंग या दोन्ही दृष्टींनी पूर्ववाङ्मयाहून किती भिन्न होत आहे हें काव्य व कथा या दोन क्षेत्रांतील निर्मितीवरून सहज दिसून येईल. १९४७ सालीं देशाला स्वातंत्र्य मिळाल्यामुळे या भिन्नतेचें आणखी एका बाजूने पोषण होऊं लागलें आहे. मध्यंतरीच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या चळवळीमुळे आमचं सामाजिक मन व साहजिकच, कविमनहि एक प्रकारच्या धुंदींत होतें. धुंदी कसलीहि असो, ती मनुष्याला अंध करून सोडते. स्वातंत्र्याचा अमृतप्याला तोंडाला लागला असूनहि आज समाजाच्या जिभेवर जी कडू चव रेंगाळत आहे तिचें कारण १९४७ सालीं ती धुंदी उतरली आणि गेल्या सहा वर्षांत वास्तवाची, आपल्या गुणदोषांची, परिस्थितीची, शक्ति आणि मर्यादा यांची--अधिक तीव्र जाणीव आपल्याला होऊं लागली हें आहे.

हीं सर्व स्थित्यंतरें लक्षांत घेतां गेल्या ऐंशी वर्षांतल्या वाङ्मयाचा वस्तुनिष्ठ दृष्टीने परा-मर्श घेणें, भावी अभ्यासकांना उपयुक्त होईल अशी त्याविषयीची माहिती संकलित करणें, सामाजिक व वाङ्मयीन अशा दोन्ही दृष्टींनी या काळांतल्या वाङ्मयाचें पुन्हा मूल्यमापन करणें हीं कामें आवश्यक ठरतात. प्रा. भवानीशंकर पंडित यांचा तीनशें साडेतीनशें पृष्ठांचा हा ग्रंथ म्हणूनच मला स्वागतार्ह वाटतो.

या पुस्तकांत त्यांनी केलेल्या काव्यचर्चेत विशेष नावीन्य आहे असें नाही. आधुनिक कवि-तेच्या जन्मापासून तिला मातबर समर्थक व विरोधक मिळाले आहेत. विविधज्ञानविस्तारासारख्या

जुन्या प्रतिष्ठित मासिकाचे अनेक वर्षांचे अंक चाळून पाहिले तर त्यांत काव्यपरीक्षणालाच अधिक जागा मिळाली होती असें दिसून येईल. त्या काळांत कथाकादंबऱ्यांना मोठ्या प्रमाणांत वाचकवर्ग मिळाला असेल. पण नाट्य व काव्य यांच्या चिकित्सेंतच तत्कालीन रसिक, टीकाकार व पंडित यांना अधिक आनंद वाटे. यामुळे आपल्याकडे गेल्या पन्नास वर्षांत काव्यविषयक स्फुट लिखाण पुष्कळच झालें आहे. अशा फुटकळ टीकापर अगर विवेचनपर लेखांनी त्या त्या काळच्या वाचकांची रसिकता व चिकित्सकता यांचें चांगलें पोषण केलें आहे. पण स्फुट लेखांचे संग्रह क्वचितच होत असल्यामुळे पुढील पिढींतल्या अभ्यासकांच्या दृष्टीने ते असून नसल्यासारखेच होतात. उदाहरणच द्यायचें तर कै. वा. अ. भिडे यांच्या टीकात्मक लेखांचें देतां येईल. भिडे हे आपल्या पिढींतले अव्वल दर्जाचे टीकाकार होते. पांडित्य व रसिकता यांचा चांगला मेळ त्यांच्या ठिकाणीं दिसून येत असे. त्यांच्या विवेचनपद्धतींत जशी सूक्ष्मता होती, तसा भाषेंतहि डौल होता. माधवराव पटवर्धनांची पहिलीं प्रेमकाव्यें वाचून ' प्रणयपंढरीचा वारकरी ' हें श्लेषें विशेषण त्यांना बहाल केलें तें भिड्यांनीच. पण उपरोधाने खुमासदार बनलेल्या आणि व्यासंगपूर्ण चिकित्सेने वाचनीय वाटणाऱ्या भिड्यांच्या टीकालेखांचा आजच्या पिढीला काय उपयोग आहे ? परंपरागत संस्कृतींतील इष्ट भागाचें संरक्षण करण्याची कला अजून आपल्या अंगवळणीं पडली नाही हेंच खरें.

अशा स्थितींत प्रा. पंडित किंवा प्रा. जोग ( अर्वाचीन मराठी काव्य–प्रकाशन वर्ष १९४६ ) ह्यांनी परिश्रमपूर्वक लिहिलेलीं पुस्तकें रसिक व विद्यार्थी यांच्या दृष्टीने अत्यंत उपयुक्त ठरतात यांत शंकाच नाही. या दोन्ही पुस्तकांत लेखकांचे परिश्रम पूर्णपणें प्रतिबिंबित झालेले आहेत. माहिती मिळविण्यांत व तिचें व्यवस्थित संकलन करण्यांत जोग व पंडित यांच्यापैकीं कुणीच कुचराई केलेली नाही. मात्र अशा पुस्तकांचे मी मुख्य तीन हेतु मानतों. पहिला, ऐतिहासिक स्वरूपाच्या माहितीचें संकलन. दुसरा, रसग्रहणात्मक पण विवेचक समालोचन. आणि तिसरा, आजच्या काळाच्या व अक्षरवाङ्मयाच्या दृष्टीने पुनर्मूल्यमापन आणि सामाजिक व वैयक्तिक पार्श्वभूमीच्या साहाय्याने प्रत्येक प्रमुख प्रतिभावंताच्या विकासाचें चित्रण. जोग व पंडित यांच्या पुस्तकांनी पहिला हेतु सामान्यतः सारखाच सिद्धीला जाईल. दुसऱ्या हेतूच्या बाबतींत पंडितांचें पुस्तक जोगांच्यापेक्षा अधिक सरस वाटतें. टिपणांच्या आधारें बोलणारा वक्ता आणि आपला विषय फुलवीत बोलणारा वक्ता यांच्यांत जें अंतर आहे तेंच जोग व पंडित यांच्या पुस्तकांत आहे. जोग एकेकाळीं कवी होते. पण त्यांच्या काव्यविवेचनांत त्या कवित्वाच्या खुणा सहसा दृग्गोचर होत नाहीत. त्यांच्या पुस्तकांत बहुतेक ठिकाणीं कवीपेक्षा प्राध्यापकच प्रबळ झालेला दिसतो. पंडितांचें तसें नाही. दोन तपांपेक्षा अधिक काळ ते अखंडपणें काव्याची उपासना करीत असून प्रस्तुत पुस्तक लिहितांनाहि त्या भूमिकेचा त्यांना विसर पडलेला नाही. त्यांचें विवेचन वाचतांना आपण एखाद्या प्रयोगशाळेंत बसलों नसून उद्यानांत सहल करीत आहों असा अनेक ठिकाणीं भास होतो. दत्त कवीविषयीं लिहितांना ' बा नीज गडे, नीज गडे लडिवाळा ' ह्यासारख्या कवितांचा उल्लेख करून त्यांचें वैशिष्ट्य ते एकाच वाक्यांत मोठ्या मार्मिकपणें सांगतात. ' या गीतांतील शब्दांत आर्द्रता आहे आणि सुरांत आर्तता आहे. ' ( पृ. १६८ ). रेंदाळकरांच्या कवितेंत प्रतिभेच्या नर्तनापेक्षा बुद्धीच्या चतुरस्रपणाचाच भाग अधिक होता. त्या-

मुळेच विपुल व अखंड काव्यलेखन करूनहि बालकवि व गोविंदाग्रज यांच्या पंक्तींत त्यांना कधींच स्थान मिळालें नाही, ही वस्तुस्थिति पंडितांनी अशी वर्णन केली आहे. ' रेंदाळकरांची लेखणी चपल होती. त्यांच्यापाशीं काव्यविषयांच्या साधनसामुग्रीची कमतरता नव्हती. तिची कुशलतेने मांडणी करण्यांत ते प्रवीण होते. पद्याची जुळणी त्यांच्या अंगवळणीं पडली होती. आणि त्यांची भाषासरणी हवी तशी लवणारी होती. या चतुरस्रपणामुळे त्यांचें काव्य विविध व विपुल आहे.' ( पृ. १७५ ).

प्रा. पंडितांचे अनेक निष्कर्षहि प्रा. जोगांच्यापेक्षा वाचकाला सत्य व सौंदर्य यांच्या जवळ नेतात. उदाहरणार्थ, जोगांच्या पुस्तकांतील २०४ ते २१४ हीं यशवंतांवरील पृष्ठें व पंडितांच्या पुस्तकांतील २३० ते २३५ हीं तेंच विवेचन करणारीं पृष्ठें तुलनात्मक दृष्टीने पहावींत. म्हणजे पंडितांच्या विवेचनांत रसिकता व मार्मिकता यांचें अधिक चांगलें मीलन झालें आहे असें मी कां म्हणतों तें स्पष्ट होईल. यशवंतांविषयीं जोग म्हणतात, ' जीवना-विषयीची यशवंतांची दृष्टि एका प्रकारच्या स्थिर नैराश्याची आहे. ' ( अर्वाचीन मराठी काव्य. पृ. २०६ ). पंडित याच गोष्टीचें विवेचन असें करतात, ' यशवंत हळवे व रडवे आहेत असा त्यांच्यावर एक आक्षेप आहे. कांही कवितांत त्यांनी विषादपूर्ण उद्गार काढले असून थोडीफार निराशा प्रगट केली आहे हें खरें आहे. स्वतःच्या भोवतालच्या संतापदायक गोष्टींना अनुलक्षून त्यांनी त्राग्याचे व औदास्याचे सूर काढले आहेत, यांतहि संशय नाही. पण म्हणून ते निराशा-वादी आहेत असें मात्र नाही. त्यांचे उद्गार संतापाचे असले तरी ते प्रांजल व प्रामाणिक आहेत. 'गुलामांच्या गाऱ्हाण्यां'त त्यांनी थुंकीझेल्या अधिकारीवर्गावर जी टीका केली आहे व शेवटीं तळतळून जे निराशेचे उद्गार काढले आहेत ते कृत्रिम, निर्जीव व नीरस आहेत असें कोण बरें म्हणेल? काव्यांतील उद्गार कोणत्याहि वृत्तीचे द्योतक असोत, ते जळजळीत व जिवंत आहेत किंवा नाहीत हेंच पाहण्यांत त्या काव्याची खरी कसोटी ठरत असते. ( पृ. २३४ ). ' जयमंगला ' हें यशवंतांचें खंडकाव्य बंदिशाळेपेक्षा अधिक सरस व निर्दोष आहे असें जोग मानतात. प्रा. पंडितांचें मत थेट उलट आहे. ' प्रथमपासून अखेरपर्यंत करुणाची दाट छाया या काव्यावर पडली असल्याने त्याचें वाचन जडच वाटतें ' असें जोग बंदिशाळेविषयीं म्हणतात. पंडित सांगतात, ' हें काव्य सहेतुक रचलें असलें तरी सुंदर साधलें आहे. काव्याचा शेवट शोककारक असल्यामुळे व पात्रांचें स्वभावरेखाटन समुचित साधलें असल्यामुळे एकंदर काव्याचा परिणाम मनावर पुष्कळ काळ टिकून राहतो. '

जोग व पंडित यांच्या पुस्तकांची तुलना करण्याचें कारण एकच आहे. अशा विषयावर एखादें पुस्तक झालें की मग तशाच प्रकारच्या पुस्तकाची आवश्यकता नाही असें अनेकांना प्रामाणिकपणें वाटतें. एकाच विषयावर अनेक लेखकांनी आपली शक्ति खर्च करणें हा एक प्रकारचा सामाजिक अपव्यय होय असें त्यांना वाटत असावें. पण थोडें खोल जाऊन पाहिलें तर एका विषयाचें अनेक लेखकांनी आपापल्या दृष्टिकोनांतून विवेचन करणें हें वाङ्मयीन प्रगतीच्या व वाचकांच्या रसिकतेच्या दृष्टीने अत्यंत आवश्यक असतें. कालिदासाचें शाकुंतल डोक्यावर घेऊन गटे नाचला असेल; पण शकुंतलेच्या कथेवर दुसरें तितकेंच सरस नाटक लिहिणें अशक्य नाही; फक्त दुसरा कालिदास जन्माला यायला हवा ! असें मी अनेकदा म्हणतों. जिथं प्रतिभेचं विलोल नर्तनच प्रभावी ठरतं अशा साहित्यक्षेत्रापुरतेंच हें सत्य आहे असें नाही. टीकेसारख्या अर्धललित व अर्धशास्त्रीय अशा क्षेत्रालाहि तें तितकेंच लागू आहे. हत्ती कसा असतो हें ठरवायला सहा आंधळे गेले आणि एकाचें मत दुसऱ्यांशीं जुळेना म्हणून

अनुक्रमणिका

भांडूं लागले ही लोककथा आपण वाचतों आणि हसतों. पण जीवनांत काय किंवा वाङ्मयांत काय सत्याचा शोध करायला शेकडों अधिकारी माणसें जातात आणि शेवटीं एकाचें मत दुसऱ्याशीं जुळत नाही असा अनुभव येतो. आम्हां सामान्यांना त्या सर्वांच्या मतांतून कणाकणाने सत्यांश घेऊनच सत्याची त्यांतल्या त्यांत निर्दोष पण संपूर्ण अशी मूर्ति तयार करावी लागते. या दृष्टीने पाहिलें तर जोग आणि पंडित यांचीं पुस्तकें परस्परांना पूरक आहेत. आधुनिक मराठी कवितेच्या विकासाची माहिती आणि प्रमुख कवींच्या कर्तृत्वाचें ज्ञान या दोन्ही बाबतींत जोगांच्याबरोबर १९४६ सालीं प्रवास करतांना वाचकांना जी शिदोरी मिळाली होती, तिच्यापेक्षा थोडी निराळी व अधिक चविष्ट अशी शिदोरी पंडितांनी त्यांच्या पदरांत घातली आहे यांत संशय नाही. जोग राजरस्त्याने दिसणारीं सौंदर्यें दाखवीत गेले. पंडित मधून-मधून पाऊल वाटांनीहि जातात. हें त्यांचें स्पृहणीय वैशिष्ट्य आहे. पंडितांच्या पुस्तकांतील ६६ पृष्ठांचा पहिला विभाग ( नवकवितेचें प्रकारवैचित्र्य ) हा विद्यार्थ्यांना आधुनिक कवितेचा रसास्वाद अधिक चांगल्या रीतीने घ्यायला प्रवृत्त करील. कवींचें वर्गीकरण, ठिकठिकाणीं उद्धृत केलेल्या काव्यपंक्तीमुळे विवेचनाला व टीकेला आलेला रसाळपणा, शुद्ध वाङ्मयीन चिकित्सेची दृष्टि कायम ठेवूनहि तिला दिलेली सामाजिकतेची जोड इत्यादि पंडितांच्या पुस्तकांतील गोष्टी वाचकांना विशेष आवडतील.

या दृष्टीने प्रा. पंडित यांचे परिश्रम सफल झाले आहेत हें मी मान्य करतों. पण त्यांचें पुस्तक वाचून संपवितांच माझ्या मनांत आलें, जोग आणि पंडित यांच्या जोडीने आधुनिक कवितेवर आणखी एक पुस्तक त्वरित झालें तरी तें हवेंच आहे. या दोन पुस्तकांत कळत न कळत अनेक उणीवा राहून गेल्या आहेत. तिसऱ्या पुस्तकांत त्या दूर होऊं शकतील. उदाहरणार्थ कवि दा. अ. कारे यांच्या कवितेविषयी पंडितांनी काय लिहिलें आहे तें पहावें. सूचींत कारे यांच्या नांवापुढे तीन पृष्ठांक आहेत—२४२, २४४ व २७३. हीं पानें उघडून पाहिलीं तर पहिल्या दोन पृष्ठांकांवर कारे यांचा केवळ नामनिर्देश आहे २७३ वर त्यांच्याविषयी दोन ओळी आहेत. त्या अशा—' बोरकरांबरोबर दुसरे एक गोमंतकीय कवि कारे यांचें स्मरण होणें अपरिहार्य आहे. परंतु अलीकडे त्यांचें काव्य फारसें दृष्टीस पडत नाही.' काऱ्यांची काव्यसरिता बोरकरांप्रमाणे अखंड वाहत राहिली नाही हें खरें आहे. पण ती कांही केवळ मासिकांत विखुरलेली नाही. ' नंदादीप ' हा त्यांचा काव्यसंग्रह उपलब्ध आहे. ' दुपार ' किंवा ' हे स्वप्नांनो ' सारख्या त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण कविता सोडून दिल्या तरी मराठींतल्या निवडक प्रेमगीतांत जिचा समावेश अवश्य झाला पाहिजे अशी एक सुंदर कविता त्यांनी लिहिली आहे. ' निःस्तब्ध रहा क्षणि या प्रणया ' ही ती कविता होय. ही कविता जवळ जवळ वीस वर्षांपूर्वी मीं प्रथम वाचली. पण तिची माझ्या मनावरली मोहिनी अजून ओसरली नाही. प्रेमिकांच्या समाधीचें वर्णन करणाऱ्या या कवितेंतल्या खालील सुंदर ओळी कोण विसरूं शकेल ?

मौन न हें संगीतपरिणति
हृदयकलशीं हो स्वरजलभरती
उसव न आतां उद्गारांप्रति
 स्वरकंप नसनसीं अनुभवुं या
 मौनांत बोलुं दे निजहृदया ॥

अनुक्रमणिका

असल्या वैगुण्यांपेक्षाहि जोग-पंडितांच्या पुस्तकांत पूनर्मूल्यमापनाचा जो अभाव आढळतो त्यामुळे त्यांच्या विवेचनाचें सामर्थ्य मर्यादित झालें आहे असें मला वाटतें. तैलचित्राप्रमाणे वाङ्मयहि अंतरावरून पाहिलें म्हणजे त्याचें खरेंखुरें सौंदर्य आपल्याला प्रतीत होतें. जगांत काल हाच फक्त शेवटीं खरा परीक्षक ठरतो. समकालिनांच्या पुष्पवृष्टींतून आणि धूळफेकींतून दिसेनासें झालेलें सत्य त्या फुलांचा निर्माल्य दूर फेकून आणि ती धूळ पुसून काढून काळच आपल्यापुढे उभें करतो. मी पुनर्मूल्यमापन म्हणतों तें हेंच. पण पंडितांच्या पुस्तकांत अशा कठोर मूल्यमापनाचा प्रयत्न फारसा झालेला नाही. उदाहरणार्थ, माधवनुजांविषयींचें त्यांचें मत पहावें. ते म्हणतात, 'माधवानुजांची कविता 'जाईच्या फुलां' सारखीच साधीसुधी व बालबोधी आहे. तिचा रंग भडक नाही की सुगंध मादक नाही तरी आपल्या अव्याजतेने व शुचितेने ती अंतःकरण ओढून घेते यांत संशय नाही.' खरी गोष्ट अशी आहे की माधवानुजांची कविता जाईच्या फुलांसारखी नसून गवती फुलांसारखी आहे. 'दीपविसर्जना'सारखी एखादी कविता सोडून त्यांच्या कविमनाने कुठे उंच भरारी घेतली आहे किंवा रसिकहृदयाच्या तारा कंपित करण्यांत अनुपम कौशल्य दाखविलें आहे असें दिसून येणार नाही. अंतःकरणाला चटका लावण्याचें सामर्थ्य तिच्यांत अत्यंत अल्प आहे. गद्य व काव्य यांच्यांतलें अंतर तीव्रतेने न जाणतां येणाऱ्या काळांत त्यांच्या सुबोध रचनेवर उच्चदर्जाच्या कवित्वाचा छाप बसला असेल. पण आजच्या वाचकाला उत्तुंग कल्पना किंवा उत्कट भावना यांचा आढळ तर त्यांच्या कवितेंत होत नाहीच. इतकेंच नव्हे तर बोधवादी रचनेला कवित्वाची पातळी गाठून येणारें विचारवंताचें प्रभावी मनहि तिच्यांत आढळत नाही.

पुनर्मूल्यमापनाचें दुसरें एक अंग आहे. त्याचाहि अभाव पंडितांच्या पुस्तकांत जाणवतो. 'विनायक तत्कालीन राष्ट्रीय जीवनाचे प्रतिनिधि होते' असें पंडित म्हणतात. तें खरें असलें तरी त्यांच्या ऐतिहासिक व राष्ट्रीय अशा संमिश्र स्वरूपाच्या कवितेला जी लोकप्रियता तिच्या जन्मकाळीं मिळाली, तिच्यांत काळाचा भाग किती होता व काव्याचा भाग किती होता याची चिकित्सा आता पूर्वग्रहविरहित दृष्टीने होणें इष्ट नाही काय ? ऐतिहासिक कवितेने माधवांपर्यंत आणि राष्ट्रीय कवितेने कुसुमाग्रजांपर्यंत मजल मारल्यानंतरहि विनायकांचें मूल्यमापन पूर्वीच्याच पद्धतीने करण्यांत स्वारस्य उरत नाही.

अशा प्रकारच्या परिश्रमपूर्वक रचल्या जाणाऱ्या पुस्तकांत लेखकाची भूमिका केवळ इतिहासकाराची नसते. ती मार्गदर्शकाची व टीकाकाराचीहि असते, हें लक्षांत घेतां गेल्या दशकांतील नव्या कवींचा शेवटच्या बारा पृष्ठांत पंडितांनी घेतलेला परामर्शहि अगदी त्रुटित वाटतो. कुणाला आवडो वा आवडो, नवकाव्य या नांवाने संबोधिली जाणारी कविता निरालें वळण घेत आहे, मराठी मनाला, जीवनाला व काव्याला विशेष परिचित नसलेल्या अक्षुण्ण मार्गाने जाण्याची धडपड करीत आहे. त्या धडपडीमागचीं कारणें व त्या धडपडीचें स्वरूप यांचा सविस्तर उहापोह या पुस्तकांत होणें आवश्यक होतें.

अशा कांही गोष्टी माझ्यासारख्या वाचकाला खटकत असल्या तरी पंडितांनी आपलें काम जितक्या परिश्रमाने तितक्याच प्रामाणिकपणाने केलें आहे. शिवाय त्यांच्या रसिक मनाची सावली या ग्रंथावर सर्वत्र पसरली असल्यामुळे त्याचें वाचन सुखद होतें हें सांगायला मला आनंद होतो.

वि. स. खांडेकर.

लघुकथा-लेखन-मंत्र आणि तंत्र [ लेखक---प्रो. ना. सी. फडके, प्रकाशक---अंजलि प्रकाशन लिमिटेड, किंमत सात रुपये.]

लघुकथालेखनाविषयींचें प्रो. फडके यांचें वरील पुस्तक हें मराठी वाङ्मयामधील अतिशय सुंदर आणि नीटनेटकें पुस्तक आहे. वाङ्मयलेखनांत लौकिक कमावूं इच्छिणाऱ्या नवीन लघुकथालेखकांना मार्गदर्शन करण्याच्या हेतूने हें पुस्तक लिहिलेलें असलें तरी त्याच्या केवळ वाचनाने किंवा अनुसरणाने श्रेष्ठ लघुकथालेखक निर्माण होतील अशी आशा बाळगण्याचें कारण नाही. लेखकांचीहि तशी अपेक्षा नाही. तथापि लघुकथेविषयीच्या आपल्या कल्पना, त्यांची मांडणी, वैशिष्ट्यें, कलांगें, मर्मस्थळें इत्यादि गोष्टींचें विवेचन करण्यास या मार्गदर्शनाच्या मिषाने लेखकांना फारच उत्तम संधि मिळाली आहे. मार्गदर्शनाच्या निमित्ताने जी संवादानुकूल, वक्तृत्वसदृश शैली यांत प्रत्ययास येते ती तर नितांत मधुर आणि अवीट आहे.

ग्रंथाचे दोन भाग आहेत. पहिल्या भागाच्या १८० पृष्ठांमध्ये लघुकथेचें कलाविषयक आणि तंत्रात्मक विवेचन असून दुसऱ्या भागाच्या २०२ पृष्ठांत या विवेचनाचा सोदाहरण खुलासा करण्यासाठी बारा लघुकथा समाविष्ट केलेल्या आहेत. हे लघुकथालेखक मराठी आणि पाश्चात्य वाङ्मय यांमधील श्रेष्ठ कलाकार आहेत. यांच्या समवेतच बंगाली, गुजराती, कन्नड, हिंदी इत्यादि अन्य भारतीय भाषांमधीलहि कलाकारांच्या गोष्टी जर समाविष्ट केल्या असत्या, तर त्या-त्या वाङ्मयामधील एतद्विषयक प्रवृत्ति व प्रगति कळण्यास आणि ग्रंथाला पूर्णोद्गार येण्यास खचीत साहाय्य झालें असतें. शिवाय ही योजना करणें फारसें अवघड होतें, असेंहि नाही.

लघुकथेच्या रचनाविषयक कल्पनांचें विवेचन प्रो. फडके यांच्या गाजलेल्या 'प्रतिभासाधन' ग्रंथांत येऊन गेलेलें आहे हें खरें; परंतु प्रस्तुत ग्रंथामध्ये त्यांनी त्या कल्पनांची फेरमांडणी केली आहे; एवढेंच नव्हे, तर त्यांचा परिपोष, पूरण, रंगभरणी, सोदाहरण खुलासा इत्यादि बाबतींत पुष्कळच नवीन मसाला घातलेला आहे. अर्थात् 'प्रतिभासाधना'च्या काळाहून प्रो. फडके यांनी यांत कांही भिन्न कल्पना मूलतः सांगितलेल्या आहेत, असें नाही. उलट कलेच्या बाबतींतली प्रो. फडके यांची भूमिका सामान्यतः पालटलेली नाही, याचाच प्रत्यय हें पुस्तक वाचतांना येत राहतो; आणि कलेच्या तंत्रावर त्यांचा जो वाजवीहून अधिक भर आहे त्याची वजावट केल्यास त्यांच्या या कलाविषयक साधारण भूमिकेबाबत मतभेदास फार थोडा अवकाश आहे. कलाकृति ही केवळ स्फूर्तीवर अवलंबून नाही. तरल कविमनाच्या बहुविध अनुभूति व तंत्राचा अखंड अभ्यास हीं तिचीं जन्मस्थानें आहेत, या श्रद्धेमधून प्रस्तुत पुस्तकाचा जन्म झाला आहे.

तंत्र ही एक साधनीभूत गोष्ट आहे आणि कलाकृतीचा परिणाम खोल व चिरस्थायी व्हावयाचा असेल तर हें साधन जितकें पाजळावें तितकें तें अधिक कार्यक्षम होईल याविषयी प्रो. फडके यांच्याशीं हुजत घालण्याचें कारण नाही. कलेचें हें तंत्रहि प्रत्येक प्रकारांत उत्क्रांत होत आलें आहे; एवढेंच नव्हे, तर तें विषयसापेक्ष, व्यक्तिसापेक्ष व कालसापेक्षहि असतें; तथापि त्यांतील प्रधान सूत्र कार्यक्षमता व परिणामकारिता हेंच आहे. आपला हा आवडता सिद्धांत प्रस्थापित करण्यासाठी प्रो. फडके यांनी अनेक दाखले दिलेले आहेत. प्रो. फडके

यांच्या सिद्धांतांची अपेक्षा न बाळगतां जरी नुसते हे अनेकमुखी दाखले अथवा 'कंठा' यासारखे त्यांचे केवळ अनुवाद वाचले तरी ते नितांतसुंदर वाटतील.

लघुकथेच्या तात्त्विक विवेचनाच्या भागांत विषयपार होऊन लेखकांनी कादंबरी, नाटक यांसारखे दुसरेहि वाङ्मयप्रकार तुलनेसाठी घेतले आहेत. लघुकथेच्या मूळ विवेचनाच्या आविष्काराठाठी या तुलना उद्बोधक आहेत. जरी लघुकथेचे वेगवेगळे प्रकार प्रो. फडके यांनी पृथक्पणें विवेचिले असले तरी ते तितकेसे पृथक् नाहीत, ही त्यांची जाणीव आणि त्याविषयी त्यांनी वारंवार दिलेले इशारे हीं लक्षणीय आहेत. कलाकृति ही स्वयंपूर्ण असली तरी ती साचेबंद असूं शकत नाही, ही जाणीव पुस्तकांत ठायींठायीं व्यक्त झालेली आहे. त्यामुळें नवकथांच्या एकंदर स्वरूपाविषयी त्यांचें मत प्रतिकूल असलें तरी जीवितांतील नाट्य, विसंगति इत्यादि त्यांनी सांगितलेल्या मूलकल्पनांवरच नवकथाहि आधारलेल्या असल्यामुळे त्यांनाहि गवसणी घालील असें तात्त्विक व व्यापक विवेचन यांत आहे. इतकें असूनहि प्रो. फडके यांचीं नवकथांविषयींचीं अखेरच्या प्रकरणांतलीं मतें मात्र निष्पक्ष वाटत नाहीत. पूर्वग्रहांचीं कोळिष्टकें त्यांना चिकटल्यासारखीं दिसतात. किंबहुना, 'अखेरचं सांगणं' हें नवकथांविषयींचें प्रकरण घाईनें तरी लिहिलें आहे किंवा खोल विचार न करतां लिहिलें आहे. नवकथांच्या समजूतदार पृथक्करणापेक्षा आपलीं मतें पटवून देण्याचा आग्रह व त्यामुळे त्यांतील सुंदर, विधायक उदाहरणें वेचण्यापेक्षा सामान्यांची निवड आणि हेत्वारोप या गोष्टी वकिली थाटाच्या आहेत. त्यामुळे प्रथमच्या समधात आणि सुरस भागाला विरसता येते. या मतावेशांत 'नीतिपरता असलेल्या लघुकथा माननीय समजल्या पाहिजेत' असेंहि त्यांनी म्हणावें याचें आश्चर्य वाटतें. प्रो. फडके यांची मूळ निर्लेप भूमिका यांत विचलित झाली आहे. रहस्यकथांचें समर्थन करण्याच्या आवेशांत मॅकबेथवर 'खूनकथा' असा शिक्का मारणें हें तर खचीत आश्चर्यजनक आहे. रहस्यकथांविषयी इतकें प्रेम असलेल्या रसिक टीकाकाराला नवकथांमधील सौंदर्य दिसूं नये, याचाहि तसाच अचंबा वाटतो.

मतभेदाचे विषय असूं शकतील, परंतु पुस्तकाचें मूलभूत सौंदर्य निर्विवाद आहे. तात्त्विक विवेचन, नंतर गोष्टी, त्यांचा रसास्वाद अशी नेटकी योजना असलेलें लघुकथेवरचें इतकें रमणीय, मनोवेधक पुस्तक मराठींत दुसरें नाही. शेवटीं दिलेल्या गोष्टींचा रसास्वाद मात्र प्रत्येक ठिकाणीं मान्य होण्यासारखा नाही. उदाहरणार्थ, मंजुळा ही प्रातिनिधिक मुलगी आहे, असें जरी त्यांनी रसास्वादांत म्हटलेलें असलें तरी ती 'असामान्य' होती, असें त्यांनी पूर्वभागांत (पृ. ५२) विधान केलेलें आहे. वस्तुतः मंजुळा ही खरोखर प्रातिनिधिक मुलगी नाही. असलीच, तर ती 'असामान्यां'ची प्रातिनिधिक आहे! किंबहुना, कलेमध्ये अस्सल अर्थानें प्रातिनिधित्व ही चीज अशक्यप्राय आहे; कारण कलाकृति ही रसयुक्त व अभिनव व्हावयाची असेल तर ती सर्वसाधारण वास्तवाहून भिन्नच होणार. तसेंच, त्यांनी निवडलेल्या सर्व गोष्टी उच्च दर्जाच्या नाहीत. 'तडजोड' ही इंदिरा संत यांची कथा तर प्रस्तुत सुंदर पुस्तकास विशोभित दिसण्याइतकी खालच्या दर्जाची आहे.

प्रो. फडके यांची शैली त्यांच्या विचाराच्या निर्मळपणाचा आणि अभिजात सौंदर्यदृष्टीचा परिपाक आहे. त्यांच्या शैलीचीं उदाहरणें दाखविणें म्हणजे ग्रंथ वाचण्याची शिफारस करण्यासारखें आहे. तथापि लघूत्तम (लघुतम), उच्चभ्रू (!), एकेरीपणा (एकजिनसीपणा-!) असासारखे कांही चमत्कारिक शब्द त्यांच्या प्रस्तुत लेखनांत खड्यासारखे बोचतात. नवलेखकांच्या भाषेच्या अनघडपणाविषयी त्यांनी जें म्हटलें आहे तें यथार्थच आहे; परंतु प्रो.

फडके यांचीहि कुरापत काढण्यासाठी एखाद्या नवलेखकाने वरील उदाहरणें त्याच्या अंगावर फेकलीं तर त्यांनाहि मुकाट बसावें लागेल.

विषयाची मुरवण प्रो. फडके यांच्या ठिकाणीं इतकी उत्तम झालेली असते आणि तिने त्यांच्या शैलींत इतकें माधुर्य सहज रितीने उत्पन्न होतें की, विषय व शैली यांचा भूषणभूष्य-भाव ठरविणें अशक्य होतें. विचार, शैली, व्यक्तिमत्त्व यांचा उत्तम परिपाक कोणत्याहि श्रेष्ठ लेखकाच्या ग्रंथांत झालेला दिसतो, तसा तो याहि ग्रंथांत निर्विवादपणें झाला आहे.

अरविंद मंगरूळकर.

शोककारण आणि मराठी शोकान्तिका (लेखक–डॉ. म. मा. अळतेकर, प्रकाशक–शां. का. टांककर, हिंदमाता प्रकाशन, २१६० पटेल टेरेस, पोयबावडी, मुंबई १२, मूल्य सात रुपये)

मुंबई विद्यापीठाने पी. एच्. डी. पदवीसाठी मान्य केलेला हा डॉ. म. मा. आळतेकर यांचा प्रबंध आहे. पद्धतशीर विषय–विवेचनाच्या सोईसाठी प्रकृत प्रबंधाचे दोन भाग केले आहेत. मराठींतील शोकान्तिकांचें सर्वाङ्गीण परीक्षण हा या प्रबंधाचा प्रधान हेतु असल्याने या परीक्षणाचे निकष पूर्वार्धांत निश्चित करून घेतलेले आहेत. त्यांत शोकान्तिकांचें स्वरूप व प्रकार, शोकपरिणाम व शोककारण या तीन विषयांचें विवेचन पाश्चात्य टीकाकारांच्या वचनांच्या आधारें केलेलें आहे. पूर्वार्धांतील विवेचनाने सिद्ध होणारे निकष लावून मराठी शोकान्तिकांचें परीक्षण उत्तरार्धांत करण्यांत आलेलें आहे. सदर ग्रंथांतील विषयाचा आणि त्याच्या मांडणीचा हा स्थूल परिचय करून देऊन त्याच्या तपशिलाचें थोडें विवेचन करतों.

शोकान्तिकेला भारतीय परंपरा नाही. यामुळे तिचें विवेचन करतांना ग्रंथकारांस ॲरिस्टॉटल्, लाँजिनस्, हेगेल्, बर्क, बुचर, ल्यूकस्, व ब्रॅड्ले या सारख्या प्राचीन व अर्वाचीन पाश्चात्य टीकाकारांचाच 'मागोवा' घ्यावा लागला आहे. तसेंच प्रत्यक्ष ग्रीक ट्रॅजेडीचा मराठी शोका-न्तिकेशीं साक्षात् संबंध नसल्याने शेक्स्पिअर व इब्सेन् या शोकान्तिकाकारांच्या कृतींकडेच अधिक लक्ष या ग्रंथांत दिलेलें आहे. 'शोकान्तिका' हा एक स्वतंत्र वाङ्मयप्रकार मानला गेला असल्याने त्यांतील शोकबीजें किंवा शोककारणें (ट्रॅजिक एलेमेंट्स) कोणतीं, त्याच्या प्रयोगदर्शनाने किंवा वाचनाने वाचकाच्या मनावर होणारे परिणाम कोणते व त्याचे प्रकार कोणते या प्रश्नांचा विचार फार सूक्ष्मपणें तिकडील टीकाकारांनी केलेला आहे. त्याचें विवेचन व परिचय चांगल्या तऱ्हेने या ग्रंथांत आला आहे. त्यांत भावनात्मक परिणामाचा विचार फक्त करुणा (पिटी) व भय (फिअर्) यांचाच मुख्यतः येतो. फार झालें तर विकट हास्य (ग्रिम्‌ह्युमर्) व अनुषंगाने वीर, रौद्र बीभत्सादि येतात. त्यामुळे ग्रंथकारांनी आपल्याकडील रसचर्चेचा भाग सदर विवेचनांत आणला आहे. पण ज्या भारतीय सुखान्तिकेसाठीच आपली रसचर्चा प्रवृत्त झाली ती सुखान्तिका आणि पाश्चात्य शोकान्तिका या प्रयोजन व परिणाम या दृष्टींनी परस्पर भिन्न असल्याने आपल्या इकडील रसव्यवस्थेचें तंत्र तंतोतंत तिकडे लागूं पडणार नाही. आपल्या नाटकांतील करुण, भयानक, बीभत्स व रौद्र हे रस केवळ आनु-षंगिक असतात तर पाश्चात्य शोकान्तिकेंत ते (निदान करुण व भयानक) अन्तिम असतात. रसांतील पोष्यपोषकभावाची ही विभिन्नता ग्रंथकारांनी नीटशी लक्षांत न घेतल्याने भारतीय

परंपरेस अनुसरून रसांचे गौणप्रधानभाव ठरविणाऱ्या 'काव्यालोचन,' 'अभिनव काव्य प्रकाश' व 'रसविमर्श' या ग्रंथांतील विवेचनावर त्यांना विनाकारण टीका करावी लागली आहे.

ग्रंथाच्या उत्तरार्धात सिद्ध निकषांनी अर्वाचीन मराठी शोकान्तिकेचें परीक्षण केलेलें आहे तें सखोल व मार्मिक आहे. त्यांत कीर्तने, किर्लोस्कर, देवल यांच्यापासून खाडिलकर, केळकर, कोल्हटकर, गडकरी, अत्रे इत्यादिपर्यंतच्या नाटककारांच्या शोकप्रधान कृतींचा परामर्ष घेतला आहे. भारतीय मन मूलतःच ध्येयवादी, श्रद्धालु आणि आशावादी असल्याने त्याच्या वाङ्मयप्रान्तांत तरी शोकान्तिकेंतील कटु सत्य मानवत नाही. त्यांतून महाराष्ट्रांतील कणखर व झुंझार वृत्तीच्या पसंतीस तें फारसें उतरलेलें दिसत नाही. त्यामुळे मराठीमध्ये तंत्रदृष्ट्या अशा कांही उत्तम शोकान्तिका झाल्या असल्या तरी शोकान्तिकेचें भवितव्य मराठी रंगभूमीवर फारसें उज्ज्वल होईलसें दिसत नाही. निदान आज तरी मराठी शोकान्तिकेची 'उर्जितावस्था नाही' असाच निर्णय ग्रंथकारांनाहि द्यावा लागला आहे. शोकान्तिकेच्या चिकित्सक अभ्यासाला प्रकृत ग्रंथाने फार मोठी मदत होणारी असल्याने मराठी टीकावाङ्मयांत याने मोलाची भर पडली आहे यांत शंका नाही.

—के. ना. वाटवे.

मुक्तेश्वरकृत महाभारत : आदिपर्व खंड १. ( संपादक : अ. का प्रियोळकर, डायरेक्टर, मराठी संशोधन मंडळ, मुंबई. )

सुमारें तीस वर्षांपूर्वी, म्हणजे इ. स. १९२३ मध्ये बी. ए. च्या परीक्षेसाठी मुक्तेश्वरी आदिपर्व वाचतांना या काव्याची 'संस्कृत महाभारताच्या धर्तीवर एक संशोधित आवृत्ति' काढण्याचा संकल्प श्री. प्रियोळकरांनी केला व आता तो सिद्धीस जाण्याच्या मार्गावर आहे असें त्यांनी संपादित केलेल्या प्रस्तुत आदिपर्वाच्या प्रथम खंडावरून वाटतें. आदिपर्वाचा दुसरा खंड प्रकाशनाच्या मार्गावर असून मुक्तेश्वरी भारताची उरलेलीं चार पर्वेंहि अशाच पद्धतीने संपादित करण्याचा श्री. प्रियोळकर यांचा मानस आहे.

पाठचिकित्साशास्त्रास ( Textual Criticism ) अनुसरून सिद्ध केलेल्या प्राचीन मराठी संहितांची महाराष्ट्रांत किती वाण आहे तें सांगण्याचें कारण नाही. तसेंच मराठीचें पाठचिकित्साशास्त्र अद्यापि प्रयोगावस्थेंत असून श्री. प्रियोळकर हे त्याचे प्रणेते नसले तरी पहिले पुरस्कर्ते होत हेंहि जाणत्यांस ठाऊक आहे. इ. १९३५ मध्ये रघुनाथपंडितकृत 'दमयंती स्वयंवरा'चे शास्त्रोक्त संपादन करून या क्षेत्रांतील आपला अधिकार त्यांनी सिद्ध केला आहे. तेव्हा मुक्तेश्वरी भारताची पाठचिकित्सायुक्त आवृत्ति काढण्याच्या कामीं श्री. प्रियोळकर हे एक अधिकारी गृहस्थ होत असें आम्हांस वाटतें. अलीकडे प्रसिद्ध झालेल्या डॉ. सुमित्रराव कत्रे[१] यांच्या एतद्विषयक इंग्रजी ग्रंथाने पाठचिकित्साशास्त्राचा तात्त्विक परिचय उत्तम रीतीने झाला तरी अभ्यासकाच्या दृष्टीने शास्त्राच्या तत्त्वज्ञानापेक्षा त्या तत्त्वज्ञानास अनुसरून केलेली प्रत्यक्ष कृति ही खरी मार्गदर्शक होत असते. या दृष्टीने विचार करतां श्री. प्रियोळकर यांचा हा उद्योग विशेष स्वागतार्ह वाटतो. 'केल्याने होत आहे रे'

१. S. M. Katre : Introduction to Indian Textual Criticism, 1941.

या समर्पोक्तीचा प्रत्यय त्यांचें ' प्राक्कथन ' वाचतांना येतो. इ. १९२४ मध्ये आदिपर्वाची मुद्रित प्रतहि जेथे मोठ्या कष्टाने मिळवावी लागली, तेथे प्रयत्नांतीं या काव्याच्या सुमारें तीस हस्तलिखित प्रती श्री. प्रियोळकरांना आज उपलब्ध झाल्या आहेत. यावरून प्रस्तुत संपादनाच्या कामीं त्यांनी घेतलेल्या परिश्रमांची थोडी कल्पना येईल. प्राचीन कवितेचीं हस्तलिखितें मिळविणें, तीं वाचणें, त्यांचें वर्गीकरण करणें, त्यांतील पाठभेदांची चिकित्सा करणें, व शेवटीं या सर्व साधनांचा वंशवृक्ष रेखाटून तद्द्वारां काव्याची मूळ संहिता सिद्ध करणें हें सर्व काम किती कष्टाचें आहे तें जाणत्यांस सांगावयास नको. पाठचिकित्साशास्त्राचीं तत्त्वें सामान्यतः एकच असलीं तरी तीं जशीच्या तशीं मराठी ग्रंथांना लागू करतां येत नसल्यामुळे मराठीच्या संशोधकांपुढे नवीनच प्रश्न उत्पन्न होतात. मराठी काव्यांच्या संशोधनांतील ही अडचण ध्यानीं घेऊन ' शास्त्र व व्यवहार यांचा शक्यतोवर सांगड घालण्याचा प्रयत्न ' श्री. प्रियोळकर यांनी केला हें ठीकच झालें. परंतु तेच म्हणतात त्याप्रमाणे या धोरणाने ' एकांतिक शास्त्रवादी व एकांतिक व्यवहारवादी ' यांचें समाधान न झालें तर त्यांत नवल नाही. आमच्या मतें श्री. प्रियोळकरांनी शास्त्रास व्यवहाराची मुरड घातली नसती तर अधिक बरें झालें असतें. कारण एकदा ' शास्त्र ' म्हटलें, की मग कितीहि तात्त्विक किंवा अव्यवहार्य झालें तरी तें ' शास्त्र ' या स्वरूपांतच पुढे यावयास पाहिजे. श्री. प्रियोळकरांनी आपल्या ' प्राक्कथनां ' त निवेदिलेल्या मुक्तेश्वरी ग्रंथसंशोधनांतील अडचणी आम्ही जाणतों. पण अशा ठिकाणीं सारासारविवेक वापरावा लागतो, तेथे तत्त्वास व्यवहाराची मुरड घालणें अयोग्य ठरतें. विवेक व व्यवहार यांतील अंतर श्री. प्रियोळकरांना सांगण्याची आवश्यकता नाही. असो. परंतु हा केवळ तात्त्विक विचार झाला. त्यांचें एकंदर संपादन समाधानकारक असून शास्त्र व व्यवहार यांची सांगड घालण्याचें त्यांचें धोरण मुक्तेश्वरी संहिता निश्चित करण्याच्या आड कोठेहि आलेलें नाही असाच अभिप्राय कोणीहि देईल.

परंतु श्री. प्रियोळकर हे केवळ मुक्तेश्वरी आदिपर्वाची संहितासिद्धि करून थांबलेले नाहीत. तर या संहितेस ' श्रीमुक्तेश्वराचा शोध ' हा संशोधनात्मक निबंध त्यांनी जोडलेला असून तो त्यांच्या अभ्यासू व साक्षेपी मनोवृत्तीची कल्पना आणून देण्यास पुरेसा आहे. या निबंधांत श्री. प्रियोळकर यांनी दोन मुख्य विचार मांडले आहेत. एक म्हणजे ' लीला-विश्वंभर ' हीं मुक्तेश्वराच्या मातापितरांचीं, किंबहुना कोणत्याहि मानवी व्यक्तींचीं नांवें नसून त्यांचें उपास्य दैवत जें श्रीदत्तात्रेय त्यांचें हें वैकल्पिक नांव होय. दुसरा विचार असा, की ' मुद्गल ' हें मुक्तेश्वराचें उपनाम किंवा कुलनाम नसून तें त्याचें व्यक्तिनाम आहे व प्रथम तो ' चिंतामणीसुत मुद्गल ' या आपल्या मूळच्या नांवानेच काव्यरचना करीत असे. पुढे मुक्तेश्वर किंवा मुक्तीश्वर हें जें त्याच्या उपास्यदैवताचें वैकल्पिक नांव तें त्याने महाभारत रचतांना धारण केलें, अर्थात् तें त्याचें मूळचें नांव नसून काव्यासाठी धारण केलेलें मुद्रा-नाम होय. वरील दोन विचार म्हणजे श्री. प्रियोळकर यांच्या मुक्तेश्वरविषयक संशोधनाचा गाभा असून त्यामुळे या कवीविषयी आज बहुतकाळ रूढ असणाऱ्या कांहीं संकेतांचा पुनर्विचार करावा लागणार असल्याने ते मूलगामी आहेत असें म्हणणें भाग पडतें. या विचारांच्या सिद्ध्यर्थ शक्य व अवश्य तो पुरावा श्री. प्रियोळकर यांनी मुक्तेश्वराच्या काव्यांतूनच दिलेला असून क्वचित् संशोधनविषयाची मर्यादाहि त्यांनी ओलांडली आहे. मुक्तेश्वर किंवा मुक्तीश्वर हें जें

६

प्रस्तुत कवीचें उपास्य दैवत तें मूळचें कोठील या प्रश्नाचा छेडा लावतांना त्यांनी भारतांतील दहावीस मुक्तेश्वरी देवळांचा जो प्रपंच केला आहे तो नवीन असला तरी कांही अंशीं अकारण व अनावश्यक (Superflous) आहे असें आम्हांस वाटतें. मुक्तेश्वराच्या सर्व लहानमोठ्या देवळांची ही यादी दिल्याने कविनामावर किंवा कविचरित्रावर कांही नवीन प्रकाश पडतो असें नाही. आपणापाशी आहे नाही ती सर्व माहिती संशोधनाच्या कामीं लावण्यांत आपल्या हातून विषयाच्या मर्यादेचें उल्लंघन झालें व अप्रस्तुतत्व दोष घडला याचें भान श्री. प्रियोळकरांना संशोधनाच्या भरांत राहिलेलें नाही. असो. हा दोष गुणातिरेकांतून निर्माण झालेला असून त्याच्या मुळाशीं संशोधनविषयक अत्युत्साह आहे असें आम्हांस म्हणावयाचें आहे. सारांश, आपण नव्याने पुढे मांडीत असलेल्या मुक्तेश्वराच्या चरित्रविषयक दोन विचारांना शक्य तेवढा अंतर्बाह्य पुरावा देण्याच्या कामीं श्री. प्रियोळकरांनी यत्किंचितहि कसूर केलेली नाही. शिवाय आपण मांडलेले हे कांहीसे क्रांतिकारक विचार निर्णयात्मक किंवा सिद्धान्तरूप होत असाहि त्यांचा आग्रह कोठे दिसत नाही. संशोधनांत अखेरचें असें कांही नसतें याची जाणीव त्यांना आहे. वरील विचारप्रणालीच्या विरुद्ध जाणारा असा कांही नवीन व निर्णयात्मक पुरावा पुढे आला तर आपलें पूर्वमत बाजूस ठेवून त्याची परीक्षा निरंग मनाने करण्याइतपत विवेक त्यांजपाशी आहे असें त्यांच्या संशोधनांत व्यक्त होणारी मनोवृत्ति पाहून वाटतें. अशा परिस्थितींत, स्वतःस संशोधक म्हणविण्याऱ्या श्री. आजगांवकर ( नवशक्ति, १९५२ ) किंवा प्रा. पंगु ( विराटपर्व प्रस्तावना, १९५३ ) यांसारख्या विद्वानांनी श्री. प्रियोळकरांविरुद्ध एवढें काहूर कां उठवावें तें आम्हांस तरी कळत नाही. याचा अर्थ श्री. प्रियोळकरांचीं मतें आम्हांस सर्वस्वीं मान्य आहेत असा नव्हे. तसेंच आजगांवकर-प्रियोळकर किंवा पंगु-प्रियोळकर या वादांत पडण्याचेंहि आम्हांस कारण नाही. वरील दोघां विद्वानांनी उपस्थित केलेल्या आक्षेपांना उत्तर देण्याचें काम श्री. प्रियोळकर यांचें आहे, आमचें नाही. तरीपण ग्रंथपरीक्षणाची मर्यादा संभाळून, संशोधनाच्या क्षेत्रांत बळावूं पाहण्याऱ्या या अनिष्ट प्रवृत्तीचा निषेध करणें हें आमचें कर्तव्य आहे. आमच्या मतें 'श्रीमुक्तेश्वराचा शोध' या श्री. प्रियोळकरांच्या निबंधांतील 'शोध' या शब्दाचा अर्थ वरील विद्वानांना बरोबर कळलेला दिसत नाही. वास्तविक तो शब्द येथे Search या अर्थाने वापरलेला आहे, Discovery या अर्थाने नव्हे. श्री. प्रियोळकर स्पष्टपणें म्हणतात, की "प्रस्तुत निबंधाचा हेतु आमच्या संशोधकमित्रांना जास्त शोध किंवा विचार करण्यास कांहीतरी साधन द्यावें एवढाच आहे." (पृ. ३०.) तसेंच पूर्वसूरींचें ऋण मान्य करण्याचें सौजन्यहि त्यांनी दाखविलेलें दिसतें. 'लीला–विश्वंभर' हीं मुक्तेश्वराचीं मातापितरें नव्हत हा विचार प्रथम कै. वा. अ. भिडे व त्यानंतर प्रा. पां. जि. सबनीस यांनी पुढे मांडला हें श्री. प्रियोळकरांनी स्पष्टपणें नमूद करून ठेवलें आहे. तसेंच पूर्वसूरींचें हें ऋण मान्य करतांना प्रा. पंगु यांना दिसून आलेला 'वडीलकीचा भांडारकरी जोष' किंवा 'अगाऊ' पणा आम्हांस त्यांत कोठे आढळला नाही. शिवाय आपल्या मुक्तेश्वरविषयक मतांत 'जास्त संशोधनानंतर दुरुस्ती करण्याचें किंवा भर घालण्याचें' अभिवचनहि श्री. प्रियोळकर देत आहेत (पृ. ५). परंतु त्यावर विश्वास न ठेवतां, 'शोध' या शब्दाचा विपरीत अर्थ करून वरील विद्वद्द्वयाने त्यांजवर औपरोधिक टीकेची राळ उडविलेली पाहून कोणासहि खेदच होईल. तात्त्विक विरोध किंवा खंडन–मंडन हीं संशोधनाच्या प्रगतीस अवश्यच आहेत. परंतु हें करतांना आपली संशोधकाची भूमिका विरोधकाने केव्हाहि विसरूं नये. विरोधहि सभ्य भाषेंत करतां येतो. तसेंच तो करतांना व्यक्तिविषयक पूर्वग्रह बाजूस ठेवणें हिताचें असतें.

परंतु या तत्वाचा विसर पडल्याने श्री. प्रियोळकरांच्या संशोधनाविषयी लिहितांना त्यांच्या 'अभ्यासाचें ब्राबावाक्य' किंवा त्यांचा 'संशोधनखाक्या' यांसारखे अपप्रयोग प्रा. पंगु यांच्या लिहिण्यांत येतात. श्री. आजगांवकरांना आपली टीका 'अभिनिवेशयुक्त' असल्याची जाणीव तरी आहे. परंतु आमचे करवीरस्थ मित्र मात्र सर्वत्र 'जितं मया' अशा वृत्तीने वावरतात हें पाहून वाईट वाटतें.

असो. तेव्हा श्री. प्रियोळकरांना आमची विनंती अशी, की स्तुति–निंदा समान लेखून त्यांनी आपलें संशोधन कार्य असेंच पुढे चालू ठेवावें. तसेंच विरोधकांच्या आक्षेपांचाहि त्यांनी सहानुभूतीने व निरंग मनाने विचार करून अवश्य तर--व तरच--आपल्या मतांत बदल करण्याचें धैर्य दाखवावें. मराठींत संशोधन असें आधीच अत्यल्प होतें. त्यांतून कोणी तें मनोभावें करूं लागला तर त्यांचे पाय चावरी टीका करून मागे ओढणें बरें नव्हे, या बुद्धीने थोडें विषयांतर केलें याबद्दल कोणींच रागलोभ धरूं नये. शेवटीं, "I think you are the first scholar consciously applying the principles of textual criticism to the preparation of a critical edition of a Marathi text."—या विख्यात पाठचिकित्साशास्त्रज्ञ कै डॉ. सुखटणकर यांनी इ १९३५ मध्ये 'दमयंती–स्वयंवर' वर दिलेल्या अभिप्रायास जागून मुक्तेश्वरी भारताच्या शास्त्रोक्त संपादनाचें कार्य हातीं घेतल्याबद्दल श्री. प्रियोळकर यांचें अभिनंदन करून हें समीक्षण संपवितों.

—शं. गो. तुळपुळे.

वृत्तपत्रांचा इतिहास [ लेखक–विनायक कृष्ण जोशी व रामचंद्र केशव लेले प्रकाशक–वासुदेव विष्णु भट, युगवाणी प्रकाशन, भीमरावबाडी, मुंबई २, किंमत १५ रुपये पृष्ठसंख्या– ५६२+४८ (डेमी आकार). ]

एखाद्या विषयाचा सांगोपांग इतिहास साधार व समतोल रीतीने कसा लिहावा, याचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून या ग्रंथाकडे कोणीहि खुशाल बोट दाखवावें. हिंदुस्थानांतील वृत्तपत्रांचा १७८० ते १८८० शतकांतील प्रगतीचा आलेख या पहिल्या खंडांत बारा विभागामध्ये काढण्यांत आलेला आहे. दुसऱ्या खंडांत १८८० पासून सुरू होणाऱ्या 'केसरी'-युगापासून दुसऱ्या महायुद्धाच्या समाप्तीपर्यंतचा काल घेतला जाईल.

छापलेल्या कागदाला सोवळ्याने स्पर्श करूं नये अशी समजूत वृत्तपत्रांच्या आरंभींच्या अवस्थेंत कशी होती आणि 'गुरुचरित्रा' सारखा पवित्र ग्रंथ छापण्यासाठी शाईत चरबीऐवजीं तूप घातलें गेल्याची जाहिरात कशी फडकली, या जुन्या आठवणी आज कोणालाहि खचित मनोरंजक वाटतील. या ग्रंथाच्या लेखकद्वयाचें कौशल्य हें की, हा इतिहास-ग्रंथहि त्यांनी अशा आठवणींनी व घटनांनी कादंबरीसारखा मनोरंजक करून मांडला आहे. आजूबाजूची माहितीहि पुरेपूर देऊन, जरूर ते उतारे त्यांत ग्रथित करून व साधकबाधक मतें मांडून आपले स्वतःचे निर्णय लेखकांनी समतोलपणें व भारदस्तपणें मांडलेले आहेत. भारत सरकारने नुकतेंच एक 'प्रेस कमिशन' नेमलें असून त्या कमिशनने सूक्ष्म-अतिसूक्ष्म माहिती मिळविण्याची कोशीस चालविली आहे. त्यांतून पुढे केव्हा वृत्तपत्रीय इतिहास जन्मास यावयाचा तो येईल; पण तसें हुकमी साधन हातीं नसतांहि, स्वतःच्या परिश्रमाने, व चिकाटीने हा इतिहास-ग्रंथ प्रसिद्ध करण्यांत जोशी-लेले यांनी मोठेंच यश संपादिलें आहे.

मराठी वृत्तपत्रांच्या जन्म-कथेला या मराठी ग्रंथांत अग्रस्थान लाभावें हें साहजिक असलें, तरी त्यांचें यथायोग्य महत्त्व वाचकांच्या चित्तावर ठसावें अशी अन्यभाषीय वृत्त-पत्रांचीहि माहिती यांत दिलेली आहे; एवढेंच नव्हे तर, पुराणकालांतील नारद-संजयापासून इतिहास-कालांतील भाट-हेर-नजरबाज इत्यादि वार्ताहरांच्याहि कुळ-कथा निवेदिल्या आहेत. फार काय, इ. स. ६१ मध्ये सीझरने काढलेल्या वृत्तपत्रापासून रॉयटर या आजच्या वृत्त-संस्थेपर्यंतचा पाश्चात्य वृत्त-सृष्टीचाहि धावता आढावा त्यांत घेतलेला आहे. वृत्त-सृष्टीबरोबर मुद्रण-कलेचाहि इतिहास लेखकांनी कथन करून आपल्या विषयाची बैठक विस्तृत केली आहे. पेशवाईच्या काळीं लखनौ येथे इंग्रजांनी आतषबाजीचा म्हणजे दारूकामाचा जो अपूर्व 'तमाशा' करून दाखविला, त्याचें बहारदार वर्णन या पुस्तकांत उध्दृत केलें आहे. तसेंच डॉ. कॅरेप्रभृति मिशनऱ्यांनी स्वधर्मप्रसाराच्या हेतूने कां होईना, पण मुद्रण-कलेचा व तिच्या पोटीं जन्मणाऱ्या वृत्तपत्र-कलेचा कसा विकास केला, हा सारा इतिहास केव्हाहि वाचनीयच आहे. पाश्चात्य विद्येच्या प्रेरणेने बंगालमध्ये वृत्तसृष्टीची सुरुवात प्रथम कशी झाली याची हकीकतहि विस्ताराने देण्यांत आलेली आहे.

मुंबईचा टाइम्स् व मुंबई समाचार या शताधिक आयुष्य भोगणाऱ्या वृत्तपत्रांच्या जीवनांत कोणकोणतीं स्थित्यंतरें झालीं, याचा चित्रपट या ग्रंथांत पहावयास सापडतो. 'मुंबई समाचार' या साप्ताहिकाची वर्गणी २४ रुपये होती व ती देणारे ग्राहक ९६ होते. सरकारने ५० प्रति घेऊन ह्या साप्ताहिकाला उदार आश्रय दिला होता. टपालाचे दर सर्व-सामान्य पत्रांपेक्षा वृत्तपत्रांना दुप्पट असत, आजच्या काळाप्रमाणे कमी नसत. १८३२ सालीं सुरू झालेलें मराठींतील पहिलें वृत्तपत्र 'दर्पण' याला मोठी लोकप्रियता लाभली होती—म्हणजे किती वर्गणीदार मिळाले होते ? तर २८० ! पण त्याची प्रत्येक प्रत सर्वसाधारणपणें पन्नास इसम वाचीत—किंवा समुदायामध्ये त्याचें वाचन होई. असे जुन्या माहितीचे सुवर्ण—कण या ग्रंथांत सर्वत्र विखुरलेले आहेत. 'इंदुप्रकाश'मध्ये श्रीमान् अरविंदबाबूंची लेखमाला आल्याचें वाचावयास मिळतें, १८५७च्या 'बंडाची' खबर तेव्हाच्या 'धूमकेतू'त दृष्टीस पडते, तर चटकदार टीकेचा नमुना म्हणून 'गोऱ्या बुवडाचें' 'लोककल्याणेच्छु'मधील समग्र पत्र पहावयास सापडतें. पहिली आगगाडी, पहिलें तारायंत्र या देशांत आलें, तेव्हाचे कुतूहल दर्शविणारे उतारेहि या ग्रंथांत वाचावयास मिळतात.

वृत्तपत्रें व सरकार यांचे संबंध कसे होते, याचें सूत्र या ग्रंथांत आरंभापासून अखेरपर्यंत गोवलेलें आहे. परक्या सरकाराशीं लढा करणें हें ध्येयवादी वृत्तपत्राचें जीवित—कार्यच. भिन्नभिन्न शासनकर्त्यांनी वृत्तपत्राकडे डोळे वटारून कसें पाहिलें व मुद्रण—स्वातंत्र्याचा संकोच—विस्तार कसा केला, याचा विस्तृत इतिहास या ग्रंथांत प्रमुखपणें आलेला आहे. विशेष हें की, भारतांतील पहिलें वृत्तपत्र 'हिकीज गॅझेट' हें १७८० मध्ये सुरू झालें. त्याचा संपादक हिकी याची सरकाराशीं झटापट, त्यापायीं तुरुंगवास, त्याच्या संसाराची राखरांगोळी, १६ वर्षांनंतर सरकारकडून ३५ हजाराऐवजी मिळालेली आठ हजारांची रक्कम—इत्यादि झगडा, क्लेश, लाचारी यांनी भरलेली हकीकत हृदयद्रावक आहे. आणि देशी पत्रांच्या संपादकांचें जीवन म्हणजे तर सतीचें वाणच ! वृत्तपत्रांच्या ह्या उषःकालींहि नियंत्रण, माफी, दंड, तुरुंगवास, हद्दपारी इत्यादि शिक्षा संपादकाच्या पांचवीला पूजलेल्याच ! 'क्युरिअर' सारख्या 'टाइम्स' च्या एखाद्या पूर्वजाला सरकारकडून वीस हजार रुपयांचा मलिदा मिळे—बाकीच्या वृत्तपत्रांना पंचाग्निसाधनच करावें लागे—अजूनहि करावें लागतें. अशा झुंजार लोकाग्रणींच्या संग्राम—कथा

या ग्रंथांत वाचतांना कोणालाहि अभिमान व आनंदच वाटेल. राजा राममोहन रॉय किंवा विष्णुशास्त्री पंडित अशा समाजोद्धारकांच्या कार्याचें गुण–गायन लेखकांनी मुक्तकंठाने केलें आहे, ज्ञानप्रकाशादींच्या गुण–दोषांचें मापन यथोचित केलें आहे, पण पुणें–मुंबईच्या संस्कृतींचें व मालाकार चिपळूणकरांच्या कार्याचें जें विवेचन केलें आहे, त्यांत मतभेदास व चर्चेस जागा आहे. पण अशा इतिहास-ग्रंथाच्या मानाने अशीं विवाद्य स्थळें थोडींच आहेत. एकंदर माहिती आधारपूर्वक व विवेचन युक्तिवादपूर्ण असून निर्विकार इतिहासकाराला अवश्य ती वृत्ति सर्वत्र खेळत आहे, याबद्दल लेखकद्वय अभिनंदनास पात्र आहे.

— दा. न. शिखरे.

गीताप्रणीत व्यवहारशास्त्र :—( लेखक : श्री. म. श्री. मुंडले वकील, मोर्शी ( वऱ्हाड ) प्रकाशक : सौ. सरलाबाई मुंडले. किंमत ६ रु. )

मूळ पाहूं जातां गीता हा स्वतंत्र ग्रंथ नव्हे. सरासरी एक लक्ष लोकसंख्या असलेल्या 'व्यासोच्छिष्टं जगत्सर्वं' अशा स्वरूपाच्या प्रचंड महा ( न ) भारताचा सातशें श्लोकांचा अर्जुनमोहनिरसनाचा छोटासा भाग म्हणजे गीता. पण ह्या चिमुकल्या गीतेची जगांतील अनेक भाषांत भाषांतरें झालीं. असंख्य पंडितांनी, आचार्यांनी, संतांनी व सामान्य संसारी जनांनी गीतेचा परामर्श घेतला. गीतेवर टीका व भाष्यें लिहिलीं गेलीं आणि अनेक प्रबंध रचण्यांत आले. लोकमान्य टिळक, महात्मा गांधी आणि आचार्य विनोबा भावे ह्या आधुनिक महापुरुषांनी शंकराचार्य, रामानुजाचार्य, ज्ञानेश्वर, वामनपंडित यांच्याप्रमाणेच गीतेवर भाष्यें व प्रवचनें केलीं. खिस्ती लोकांना जसें बायबल किंवा मुसलमानांना कुराण त्याप्रमाणे हिंदुमात्राला गीता हा अत्यंत पूज्य ग्रंथ वाटतो. पण गीतेंत मात्र कुठेंहि हिंदु किंवा हिंदुधर्म असा शब्द आलेला नाही. एका भारतीय अवतारी पुरुषाने एका संमूढ भारतीय वीराला सांगितलेलें मानवी जीवनविषयक तत्त्वज्ञान म्हणजे गीता-ग्रंथ होय. पंडित नेहरूंच्या निधर्मी राजाच्या कल्पनेला उचलून धरणारा हा सूत्रसिद्धांत पद्धतीने लिहिलेला वेदांतग्रंथ होय.

मोर्शी ( वऱ्हाड ) येथील अध्यात्म-जिज्ञासू वकील श्री. म. श्री. मुंडले ह्यांनी हा ग्रंथ लिहितांना सर्वसामान्य संसारी माणसाची व्यवहारी भूमिका घेऊन गीता ही प्रत्येक प्रसंगीं कसें योग्य मार्गदर्शन करूं शकेल याचें अनेक उदाहरणें व दृष्टांत देऊन मोठें सुंदर व मार्मिक विवेचन केलें आहे. अध्यात्माच्या गुंतागुंतीच्या जाळ्यांत न सापडतां केवळ मानसशास्त्र आणि नीतिशास्त्र ह्या दोन दृष्टिकोनांतूनच त्यांनी व्यवहारांतील निरगाठी सरळ रीतीनें सोडविण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे. पूर्वसूरींच्या ग्रंथांत समाविष्ट झालेल्या सिद्धांतांचें खंडन-मंडन करण्याच्या तर्कटी खटाटोपांतहि ते पडले नाहीत. त्यामुळे ग्रंथांतील विवेचन सुबोध व रसाळ उतरलें आहे. गीतेंत युक्तायुक्त आहारविहारापासून तों मोक्षापर्यंत अनेक विषयांचा विचार आला आहे. पुरुषार्थ मासिकांतील लेखमालेंत ह्या सर्व प्रश्नांचा लेखकाने उहापोह केला असला तरी गीताप्रणीत व्यवहारशास्त्रांतील विवेचन द्विदलात्मक आहे. आत्महिताच्या जोडीने परहिताची दृष्टि ठेवूनच माणसाने आपलें कर्तव्य निश्चित केलें पाहिजे. एकांगी दृष्टि ठेवून यश लाभणार नाही. 'बहुसंख्य जनांचें बहुतांश हित साधणें' ही गीतेची शिकवण नव्हे. कारण त्यामुळे बहुसंख्यांचें अल्पांश हित व अल्पसंख्यांकांचें बहुतांश हित उपेक्षणीय ठरते. सर्वभूतमात्रांचें पूर्णपणें हित साधावें म्हणून निरपेक्ष कर्म

केल्यानेच माणसास आत्मशांति लाभूं शकेल. ध्यानयोग, युक्तायुक्त आहारविहार, भावनाशुद्धि, बुद्धियोग, ज्ञानयोग, आत्मविजय व कर्मयोग ही आत्मशांतीची सप्तपदी होय.

गीतेंत धर्म आणि व्यवहार यांत कोणताच फरक केलेला नाही. सत्य, अहिंसा, समता सेवा, प्रेम आणि निरपेक्षता ह्या गुणांचें परमार्थ-साधनांत जेवढें महत्त्व तेवढेंच इहलोकांतहि आहे. मानवलोकीं आणि देवलोकीं निरनिराळीं नाणीं प्रचारांत नाहीत. ऐहिक वैभवापेक्षा पारलौकिक वैभवाची योग्यता फार मोठी आहे. ज्या गुणसमुच्चयाने मोक्ष मिळूं शकेल त्याच गुणांनी व्यवहारांत सहजरीत्या यश मिळवितां येईल. म्हणूनच साध्याइतकें साधनांनाहि महत्त्व आहे.

ह्या ग्रंथाच्या जन्माची कथा मोठी दुःखद आहे. लेखकाचा एक पुत्र घरीं आजाराने आणि तीन महिन्यांच्या आंतच दुसरा ब्रह्मदेशांत धारातीर्थी पडल्यामुळे मनाला झालेल्या दुःखाच्या परिहारार्थ लेखकाने जें वाचन व मनन केलें त्यांतून ह्या ग्रंथाचा जन्म झाला. गीतेच्या अभ्यासाने लेखकाला व त्याच्या पत्नीला आत्मशांतीचा लाभ झाला. ह्या ग्रंथांत तर्कटी पांडित्याचा अभाव आहे. प्राचार्य डॉक्टर रा. द. रानडे यांच्या मतें 'श्री. मुंडले यांची विवेचनपद्धति मुद्देसूद, तर्कशुद्ध व रेखीव असून त्यांची भाषा सुबोध, प्रासादिक, ओघवती व आकर्षक आहे.' गणितशास्त्राच्या पुस्तकांत प्रारंभीं सूत्र देऊन त्या अनुरोधाने अनेक भिन्न-व्यवहारी उदाहरणें सोडवून दाखविण्यांत येतात, तशीच मनाला चटकन् पटणारी या ग्रंथाची रचना आहे. संत तुकडोजी महाराजांच्या मतें 'श्री. मुंडले वकील यांनी गीतेचें यथार्थ रूपांत दर्शन घेण्याचा व तिचें प्रत्येकाला जीवनांत उतरवण्यासारखें व्यवहार्य स्वरूप विवरणासह लोकांसमोर मांडण्याचा प्रयत्न या ग्रंथांतून केला आहे.'

गीता व व्यवहार, मनाची उपासना, भावनाशुद्धि, इच्छा, फलासक्ति, ममत्व व अहंकार आत्मौपम्य, भक्तिभाव, श्रद्धा, भीति, न्यूनत्वभावना, पापपुण्य, सुखदुःख, बुद्धियोग, ज्ञानयोग, स्मरणशक्ति, अंतर्जागृत बुद्धि, कल्पनाशक्ति, एकाग्रता, ध्यान व समाधि, सदसद्विवेकबुद्धि, आत्मविजय, आत्मनिश्चय, आत्मबल, आत्मसूचना, आत्मशांति, धर्म व व्यवहार, कर्तव्य आणि उपसंहार या सुटसुटीत एकुणतीस प्रकरणीं अनुक्रमणिकेच्या परिशीलनाने सुबुद्ध-वाचकांना पुस्तकांतील प्रतिपाद्य विषयाची व सुबोध रचनेची सहजी ओळख पटेल.

सर्वसामान्य संसारी माणसांना व्यवहारांत योग्य मार्गदर्शन करणाऱ्या जवळजवळ चारशें पृष्ठांच्या गीता-तत्त्वज्ञानाचें हिंदी राष्ट्रभाषेंत रूपांतर होणें अवश्यक आहे. कारण या सर्वांगसुंदर मराठी लेण्याचें मार्गदर्शन आमच्या इतर भारतीय बंधूंनाहि व्हावें अशी आमची दृढ इच्छा आहे. ती लवकरच सफल होईल असा आमचा पूर्ण विश्वास आहे.

—नारायण केशव बेहेरे.

**मोह आणि इतर कथाः**—(ले.: व. त्र्यं. सोनाळकर, प्रकाशक—अ. वि. गृह, पुणें २. किंमत—रु. दोन).

श्री. वसंतराव सोनाळकर यांच्या दहा कथांचा हा संग्रह. आजच्या मराठी लघुकथेंत अनेक नवे प्रवाह व नव्या प्रवृत्ति निर्माण झाल्या आहेत. गोखले-गाडगीळादि कथालेखकांच्या लघुकथांतून त्यांचें दर्शन आपणांला होतें. पण त्याबरोबर जुना प्रवाहहि मराठी लघुकथेंत

चालूं आहे. त्या जुन्या प्रवाहाचें सौन्दर्य पहावयाचें झालें तर सोनाळकरांच्या या कथासंग्रहाकडे बोट दाखवावें लागेल. यांतील पुष्कळच कथा घटना-प्रधान आहेत — पण त्यांत कथानक-रचनेचें सौंदर्य निश्चित दिसतें. स्वभावरेखन सांकेतिक पद्धतीने झालें आहे पण त्यांत रेखीवता व ठसठशीतपणा आहे. आणि विशेष म्हणजे रंजकता हा गुण या संग्रहांतील प्रत्येक कथेंत दिसून येतो. मग त्यामध्ये योगायोग असोत-चमत्कृति असो अगर अद्भुतरम्यता असो. ऐन मोहाच्या क्षणीं सुंदर वारांगनेच्या सहवासांत असतांना तिची खड्याची आंगठी बोचल्याबरोबर स्वतःच्या पत्नीची आठवण होऊन मोहापासून परावृत्त होणारा नायक, आपल्या हातून चूक झाली हें कळतांच त्यासाठी खरी जबानी देऊन व शिक्षा सोसून पापाचें क्षालन करणारा बाबा पाटील, आग्र्याला हिंदु-मुसलमानांच्या दंग्याच्या प्रसंगीं मुसलमानांच्या तावडींत सापडलेला पण मोठ्या हिकमतीने त्यांच्या तावडींतून सुटका करून घेणारा शिवाजी—हीं सारीं चित्रें अतिरंजित वाटतात--पण तरीहि मनाची पकड घेतात. स्वभावरेखनांत लेखकांनी जे गहिरे रंग भरले आहेत त्यामुळे ह्याच काय पण अविनाश--ह्न्या महार-रामकरण शेट अशा अनेक व्यक्ति आपल्या ठसठशीत व्यक्तिमत्वाने रसिकांच्या मनाची पकड घेतात.

घटनांचा आराखडा डोळ्यासमोर ठेवून यांतील बहुतेक कथांची रचना केली असल्याने यांतील बऱ्याच कथांना सुबक घाट आला आहे. ' मोह ', ' सुटका ', ' छायाप्रकाश ' या कथेंतील पाल्हाळ जरा खटकतो. पण इतरत्न मात्न कथानकाची रेखीव बांधणी साधण्याचा लेखकाने प्रयत्न केला आहे-आणि तो बराचसा साधलाहि आहे. कांही ठिकाणीं ओ हेन्रीच्या पद्धतीची अनपेक्षित कलाटणीहि साधली आहे. त्यांच्या निवेदनशैलींत सरलता व वेधकता आहे. त्यामुळे कथानक चटकन् मनाची पकड घेते व ती पकड गोष्ट संपेपर्यंत कायम टिकते. त्यांच्या निवेदन-पद्धतींतील हें आकर्षण उल्लेखनीय आहे.

सांकेतिक कल्पनांच्या आहारीं जाऊन कांही कथांचें पर्यवसान अवास्तव झाल्यासारखें वाटतें; त्याचप्रमाणे यांतील कांही घटना व व्यक्तिचित्रेंहि अतिरंजित वाटतात. पण हे दोष लेखकाच्या एक विशिष्ट प्रवृत्तींतून निघाले आहेत. ' रंजकता ' हा एकच निकष श्री. सोनाळकरांनी डोळ्यासमोर ठेवला आहे. आणि त्या निकषावर घासून पाहतां यांतील प्रत्येक कथा त्या कसाला उतरावी इतकी वेधक आहे. मग त्यांच्या प्रतिभेने थोडेंफार स्वप्नरंजन केलें तर बिघडलें कुठे ?

—म. ना. अदवंत.

**दुसरा संसार :—** [ लेखक:—ज. ना. ढगे. प्रकाशक : – के. भि. ढवळे. मुंबई ४. मूल्य ३ रुपये ]

श्री. ज. ना. ढगे यांचा हा कथासंग्रह. व्यापार संभाळून फावल्या वेळांत हौसेने केलेलें हें लेखन आहे. त्या दृष्टीने तें कौतुकास्पद आहे. मध्यमवर्गीय जीवनांतील कांही ठराविक समस्या रंगविण्याचा यांत प्रयत्न केला आहे. प्रेमाचा त्रिकोण, किंवा स्त्रीचें आर्थिक स्वातंत्र्य या समस्या आता नवीन नाहीत. मुलीच्या इच्छेविरुद्ध तिचें लग्न होऊन दोन जीवांचा मनोभंग झाल्याचे प्रसंगहि साहित्यांत पुष्कळ वेळां रंगविले गेले आहेत. त्यामुळे आशयांत नावीन्य नाही आणि अभिव्यक्तींतहि नाही. अतिरंजित प्रसंगांच्या आधारें निर्माण केलेल्या या समस्या मनावर फारसा परिणाम करीत नाहीत. पृष्ठ १२५ वर कु. नयनेने विद्याधरला लिहिलेलें पत्र

उदाहरण म्हणून पाहण्यासारखें आहे. असें पत्र कोणती विद्यार्थिनी आपल्या प्रोफेसरला, विशेषतः विवाहित प्रोफेसरला लिहील हा प्रश्नच आहे. किंवा आपल्यामुळे आपल्या प्रियकराच्या वैवाहिक जीवनांत वादळें निर्माण होत आहेत हें दिसत असूनहि त्याच्या जीवनांत वारंवार येणारी व मरतांना त्याच्याच पत्नीचा हात त्याच्या हातांत देऊन पुन्हा तिला उपदेश करणारी मंजुळा अद्भुत कोटींतीलच वाटत नाही काय ? बहुतेक कथांतील प्रसंग असे अवास्तव आहेत. ' नशीब उघडलें ' ही जी एक लांबच लांब पत्लमय गोष्ट आहे तींत केवळ धुंडिराज वैद्याच्या मुलीशीं लग्न करण्यासाठी नानाच्या बायकोला मृत्युमुखीं लोटलें आहे—आणि तेवढेंच साधायला एकवीस पानें खर्ची घातलीं आहेत. आणि इतकें करून पत्नी मेल्यावर पहिल्या वर्षी लग्न केलें नाही तर तीन वर्षेपर्यंत लग्न करतां येत नाही या खबरीवर तावडनीब बोहोल्यावर उभें राहण्याची तयारी दाखविणारा नाना किंवा नानाच्या बायकोच्या मृत्यूमुळे आपल्या मुलीचें नशीब उघडलें असें समजणारा धुंडिराज वैद्य या दोघांहिविषयी मनांत सहानुभूत निर्माण होत नाही. आपल्या प्रियतमेशीं वेळोवेळीं तुलना करून आपल्या बायकोला सतत तुच्छ लेखणारे व कटु भाषणांनी तिचें मन दुखविणारे बापू किंवा विद्याधर हे दोन्ही नायक याच कोटींतील आहेत. त्यामानानें प्रियतमेचें लग्न झाल्यावर तिच्यावरील निस्सीम प्रेमाने अविवाहित राहणारा ' बाप की वैरी ' मधील बापू किती तरी चांगला.

संग्रहांतील ' मधुचंद्र ', ' एक प्रसंग ' व ' शिझु यामामोटो ' या तीन कथा अनुवादित आहेत आणि हा अनुवाद चांगला केला गेला आहे. त्याचप्रमाणे ' सौदा ', ' अनपेक्षित ', ' सिल्कचा सूट ' या कथांतील घटनांची मांडणीहि चांगली साधली आहे. विशेषतः कथानकाला अनपेक्षित कलाटणी देऊन वाचकांना स्तिमित करण्याचें लेखकाचें कौशल्य या तीनहि कथांतून चांगलें दिसून येतें.

' दुसरा संसार ' या कथासंग्रहाचें स्वरूप हें असें आहे. लेखन हा श्री. ढगे यांचा दुसरा संसार आहे. तेव्हा त्यांत कौतुकाचा व हौसेचाच भाग आधिक असावा हें स्वाभाविक आहे. वाचकांनी संग्रह वाचतांना त्याच अपेक्षा ठेवाव्या हें बरें. आणि ' आता या पुस्तकाचा उदो उदो किंवा शंखध्वनि करण्याचें काम टीकाकाराचें आहे ' अशी टीकाकारांची संभावना त्यांनी निवेदनांत केलीच आहे, तेव्हा त्याबाबतींत अधिक काय लिहावें ?

—म. ना. अदवंत.

**रूपमहाल :** [ लेखक—रणजित देसाई, प्रकाशक, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर. किंमत २॥ रुपये. ]

गेल्या दोनतीन वर्षांत विशेष प्रसिद्धीला आलेल्या तरुण लेखकांत रणजित देसाई यांचा समावेश करावयास हवा. ' प्रसाद ' मासिकाने लावलेल्या पहिल्या लघुकथा-स्पर्धेंत त्यांच्या ' भैरव ' या कथेला मानाचें पारितोषिक मिळालें आणि तेव्हापासून त्यांच्याकडे वाचकवर्ग विशेष अपेक्षेने पाहूं लागला. आणि गेल्या पांच सहा वर्षांत त्यांनी लिहिलेल्या व या संग्रहांत समाविष्ट झालेल्या कथा वाचतांना त्यांनी वाचकांच्या अपेक्षा बऱ्याच अंशीं पूर्ण केल्या असें म्हणतां येईल.

ग्रामीण जीवनावरील आठ कथा व एक ऐतिहासिक कथा अशा नऊ कथांचा या संग्रहांत समावेश केला आहे. ग्रामीण जीवनावरील कथा हा या संग्रहाचा मुख्य गाभा;

आणि त्याकडे नजर टाकली तर त्यांतील विविधता सहज जाणवते. बैलांच्या शर्यती, हत्तीची साठमारी, कुस्ती, शिकार असे अनेक विषय त्यांनी आपल्या कथेसाठी निवडले आहेत. प्रत्येक कथेंत एका सामर्थ्यवान् संघर्षाची योजना करून त्याभोवती पोषक अशा घटनांची व ग्रामीण वातावरणाची पार्श्वभूमि रंगविली आहे. त्यामुळे कथेच्या सुरुवातीपासूनच या कथा वाचकांच्या मनाची पकड घेतात आणि भोंवतालच्या रूक्ष वातावरणांतून त्यांना कांहीशा अद्‌भुत सृष्टींत नेऊन सोडतात.

मध्यवर्ती संघर्ष रंगवितांना जीं वर्णनें लघुकथेंत आलीं आहेत त्यांत लेखकाचें भाषेचें सामर्थ्य व सूक्ष्म अवलोकन यांचा चांगलाच प्रत्यय येतो. ' भैरव ' मधील बैलाच्या शर्यतीचें वर्णन, ' नंदा ' मधील शिकारीचें वर्णन, ' मैदान ' मधील भैरू आणि शिद्दा यांच्यामधील निकाली कुस्तीचें वर्णन, किंवा ' चै अगद चै ' मधील साठमारीचें वर्णन वाचत असतांना ते ते प्रसंग परिणामकारक रीतीने वाचकांच्या नजरेसमोर उभे करण्याचें आणि त्यांच्या भावना उद्दीपित करण्याचें सामर्थ्य यांच्या लेखणींत आहे याची साक्ष पटते. त्यांच्या लघुकथांच्या यशाचा मोठा वाटा अशा वर्णनाकडेच जातो असें निश्चित म्हणतां येईल.

प्रभावी समरप्रसंग हें त्यांच्या कथेचें जसें एक आकर्षण आहे त्याप्रमाणे पीळदार व्यक्तिरेखन हेंहि दुसरें आकर्षण आहे. त्यांच्या कथांतील अनेक व्यक्ति मनाला चटका लावून जातात. खानदानीपणाच्या अभिमानाने स्वतःच्या मुलाला कड्याखाली लोटणारा आबाजी पाटील, मानाच्या आहारीं जाऊन अखेरची शर्यत खेळणारे भवानराव, साठमारींत मुलाच्या मृत्यूला कारणीभूत झालेल्या हत्तीला एका चांदण्यारात्रीं एकटाच आव्हान देणारा केशव— या आणि इतरहि सर्व व्यक्तींचें चित्रण अतिशय कसदार झालें आहे. या सर्व व्यक्ति अतिशय भावनाप्रधान आहेत, आपल्या हृदयाशीं एकजीव झालेल्या भावनांसाठी प्राण पणाला लावण्याची त्यांची तयारी आहे आणि म्हणूनच त्यांच्या वाट्याला अखेर दुःख आलें. चंद्राला दिलेलें वचन पाळण्यासाठी मरण पत्करणारा सखा, जिवाला स्वतःच्या हातांनी विष चारणारा शिवा, आपल्या आवडत्या चितळासाठी शिकार सोडणारा मानसिंग-राव या सर्व व्यक्ति त्याच जातींतील आहेत. त्यांचीं दुःखें त्यांच्या विशिष्ट स्वभावधर्मांतून निर्माण झालीं आहेत. या व्यक्ति अपवादात्मक आहेत हें खरें— पण ज्या जिव्हाळ्याने व उत्कटतेने त्यांचीं चित्रें रंगविलीं आहेत तो जिव्हाळा व ती उत्कटता वाचकाच्या मनाची पकड घेतल्याशिवाय राहात नाही.

घटना व व्यक्तिरेखन यांच्या जोडीला वातावरण निर्माण करण्याचें लेखकाचें कौशल्य विसरून चालावयाचें नाही. त्यासाठी अनेक सूक्ष्म तपशिलांचा त्याने उपयोग केला आहे. शकुनापशकुनाच्या कल्पना, जत्रेचीं व भेकनाचीं वर्णने, कुस्तीच्या फडाचीं वर्णनें हा तपशील कथेंत जिवंतपणा आणतो यांत शंका नाही. थोडक्यांत अस्सल ग्रामीण जीवनाची प्रचीति देण्याचें सामर्थ्य या संग्रहांत आहे व म्हणूनच त्यांच्या पुढील लेखनाबद्दल आशा वाटते.

—म. ना. अदवंत.

सैन्य चाललें पुढे :— [ लेखक वि. वि. बोकील, प्रका. —सुरसग्रंथमाला पंढरपूर किं. २ रु. ]

एका इंग्रजींतील कथानकाच्या आधारावर आपल्याकडील हिंदुमुसलमानांच्या दंगलीवर लिहिलेली ही कादंबरी आहे. श्री बोकील यांनी मूळचें कथानक इंग्रजींतून घेतलेलें असलें तरी त्यास चढवलेला मराठी साज झोकांत झालेला आहे. कादंबरीची भाषा ओघवती असल्याने आणि मधून मधून समर-प्रसंगांची पेरणी झालेली असल्याने कादंबरी एकादमांत शेवटपर्यंत वाचण्याचा मोह टाळतां येत नाही. या कादंबरींतील स्वभावलेखन चांगलें साधलें असलें तरी कित्येकदा मध्येच खटकावे असा भाग आला असल्याने थोडें चमत्कारिक वाटतें. विशेषत: बकुळेच्या स्वभावचित्रणांत हा चमत्कारिकपणा अनेकदा जाणवतो. कासमभाई व भिमी यांच्याबद्दल मात्र वाचकांच्या मनांत सहानुभूति निर्माण होते. एकंदरीने विविध प्रसंगांची गुंफण ठीक झाली असून शेवटहि चित्तवेधक झालेला आहे.

—सरोजिनी बाबर.

तापीतीरी : [ लेखक : रामतनय, प्रकाशक ग. ना. जोशी पुणें. किं. ५ रु. ]

विशिष्ट प्रकारच्या अखिल-भारतीय राजकीय समस्यांवर इ. स. १९३८ मध्ये लिहिलेली श्री. रामतनय यांची ही कादंबरी आक्टोबर १९५२ मध्ये प्रसिद्ध झालेली आहे ! या कादंबरींत भारताच्या अपुऱ्या क्षेत्रामुळे भासणारी धान्याची टंचाई व त्यावरील उपाय, विशाल भारताच्या न्यायनिवाड्याची मर्यादा, लोकांमधील कार्यक्षमता, क्रांतिकारकांचें ध्येयवादी जीवन आणि कार्य करण्याची पद्धति इत्यादि विषय आलेले आहेत. हें कथानक एका विशिष्ट परिस्थितींचेंच निदर्शक असल्याने इतक्या दिवसांनंतर आपण एखादा इतिहास ओळखीचा करून घेत असल्याचा भास होतो !

या कादंबरींमधील 'विशाल भारता' मध्ये भरलेला अद्‌भुतरम्य भाग वाचतांना मोठें आश्चर्य वाटतें. एवढेंच नव्हे तर या ठिकाणीं वावरणारी क्रांतिकारक मंडळी व त्यांचा इंजेक्शन देऊन अर्ध्या तासांत माणसाचें रंगरूप पालटण्यासारखे व त्यास पुन्हा पूर्ववत् करणारे असे अद्‌भुतरम्य अचाट उद्योग वाचतांना हें सारेंच जगावेगळें वाटायला लागतें ! त्यामुळे कथानकास आवश्यक असणारा स्वाभाविकपणा येथे फारसा दिसून येत नाही. कारण रोजच्या जगांत न आढळणारे ध्येयवादी (?) वातावरणच सर्वत्र आहे !

म. म. दत्तो वामन पोतदार यांची विस्तृत प्रस्तावना हाहि या कादंबरीचा दुसरा एक विशेष आहे. प्रा. पोतदारांनी आपल्या नेहमीच्या चिकित्सक दृष्टीने या कादंबरीचें केलेलें परीक्षण मार्मिक आहे. १९३० ते १९३८ मधील काळांत तयार झालेल्या हा कादंबरीच्या कथानकाची मांडणी ठीक असून भाषा सोपी व ओघवती आहे.

—सरोजिनी बाबर.

---

**श्री. विठ्ठलराव घाटे.**

अहमदाबाद येथे भरणाऱ्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून श्री. विठ्ठलराव घाटे यांची निवड झालेली आहे. त्याबद्दल आम्ही त्यांचें अंत:करणपूर्वक अभिनंदन करतों. कवि आणि लेखक म्हणून श्री. विठ्ठलराव मराठी वाचकांना चांगले परिचित आहेत. सुप्रसिद्ध रविकिरणमंडळाचे ते एक सभासद आहेत. रविकिरणमंडळाने आरंभीं आरंभीं प्रसिद्ध केलेल्या संयुक्त काव्यसंग्रहांमध्ये विठ्ठलरावांच्या कांहीं कविता प्रसिद्ध झालेली आहे. त्यांच्या 'कांहीं म्हातारे आणि एक म्हातारी' या व्यक्तिचित्रात्मक पुस्तकाचा कुणाला विसर पडणे शक्य आहे? विठ्ठलरावांच्या लेखणीचे ललित गुण त्यांत प्रकर्षाने व्यक्त झालेले आढळतात. पण यापेक्षाहि एक शिक्षणतज्ञ म्हणून विठ्ठलरावांचा लौकिक अधिक आहे. साहित्याच्या विकासासाठी आधी वाचकवर्ग तयार झाला पाहिजे. आणि वाचकवर्ग तयार होण्यासाठी महाराष्ट्रांत साक्षरतेचा प्रसार होऊन शिक्षणाची पातळी उंचावली जाणें अवश्य आहे. महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें आणि परिषदेचें कार्य साधारण जनतेपर्यंत पोचविण्याची कामगिरी श्री. विठ्ठलराव सहज करूं शकतील. आणि आमच्या दृष्टीने तेंच कार्य आज विशेष महत्त्वाचें आहे. साहित्य-विकासाच्या या योजनेची पायाभरणी जरी विठ्ठलरावांनी आपल्या कारकीर्दीत केली तरी ती यशस्वी झाली असें म्हणतां येईल. आम्ही श्री. विठ्ठलरावांच्या कारकीर्दीला सुयश चिंतितों.

**कै. पंडित बाळकृष्णशास्त्री महानुभाव.**

महानुभाव वाङ्मयाचे सुप्रसिद्ध संशोधक महंत पंडित बाळकृष्णशास्त्री महानुभाव (संस्थान, देवदेवेश्वर, माहूर) हे गेल्या महिन्यांत दिवंगत झाले ही अत्यंत दु:खाची गोष्ट होय. श्री. बाळकृष्णशास्त्री हे महंत श्री. दत्तलक्षराज महानुभाव यांचे गुरुबंधु व उत्तराधिकारी होते. महानुभाव वाङ्मयाच्या सेवेचा श्रीदत्तलक्षराजांनी निर्माण केलेला आदर्श आपल्यासमोर ठेवून श्री. बाळकृष्णशास्त्री यांनीहि आयुष्यभर तेंच कार्य अत्यंत निरलसपणें व निर्लोभपणें केलें. 'चक्रधरचरित्रपर ऐतिहासिक दृष्टि' या विविधज्ञानविस्तारांतून प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या लेखमालेमुळे ते प्रथम महाराष्ट्रीय वाचकांना परिचित झाले. पुढे नागपूर येथील 'विहंगमां'तून 'महानुभाव पंथ व त्याचे आक्षेपक' ही सुंदर लेखमाला त्यांनी लिहिली. कै. चांदोरकरांच्या चुकीच्या विधानांना उत्तर देण्यासाठी धुळे येथील राजवाडे संशोधन मंदिरांत जाऊन त्यांनी जो विद्वत्तापूर्ण निबंध वाचला त्याचा विसर अभ्यासकांना पडणें अशक्य आहे. आपल्या सर्व संशोधनाचें सार त्यांनी आपल्या 'महानुभावग्रंथ' या ग्रंथांत ओतलेले आहे. या लेखनापेक्षाहि महानु-भावीय वाङ्मयाच्या अभ्यासकांना त्यांनी अप्रत्यक्ष रीतीने केलेली मदत अधिक महत्त्वाची आहे. महाराष्ट्र साहित्य परिषदेने योजलेल्या मराठी वाङ्मयाच्या इतिहासांतील महानुभाव खंडाचे सहसंपादक म्हणून काम करण्याचें त्यांनी मोठ्या आनंदाने मान्य केलें होतें. त्यांच्यामुळे हस्तलिखित पोथ्यांची व सांप्रदायिक माहितीची जी बहुमोल मदत झाली असती तिला आता आपण मुकणार याचें फार वाईट वाटतें. शास्त्रीबोवा विद्यासंपन्न असूनहि अत्यंत विनयशील





होते. त्यांच्या मृत्युमुळे महानुभावपंथाचीच नव्हे तर प्राचीन मराठी वाङ्मयाच्या संशोधन-कार्याची फार मोठी हानी झाली आहे, यांत संशय नाही.

### कै. बी. रघुनाथ.

गेल्या महिन्यांत आणखी एक दुःखद घटना घडून आली. ती म्हणजे प्रथितयश कवि व लेखक श्री. बी. रघुनाथ यांचा आकस्मिक मृत्यु ही होय. त्यांचें संपूर्ण नांव ' भगवानराव रघुनाथराव कुळकर्णी ' असें असलें तरी मराठवाड्यांतील या तरुण साहित्यिकाला सर्व महाराष्ट्र ' बी. रघुनाथ ' याच नांवाने ओळखतो. कवि, लघुकथालेखक आणि कादंबरीकार म्हणून त्यांचा लौकिक महाराष्ट्रभर पसरलेला आहे. 'आलापविलाप' हा कवितासंग्रह, 'अलकेचा प्रवासी हा लघुनिबंधसंग्रह; ' साकी ', ' फकीराची कांबळी ' व ' छागल ' हे कथासंग्रह आणि ' ओढ ', ' हिरवे गुलाब ', ' उत्पात ', ' बाबू दडके ', ' म्हणे लढाई संपली ' आणि ' जग काय म्हणेल ' ह्या कादंबऱ्या त्यांनी आतापर्यंत प्रसिद्ध केलेल्या आहेत. त्यांचें हें लेखन जितकें विविध तितकेंच विपुलहि आहे. या सर्वांतून मराठवाड्याचें प्रादेशिकत्व उत्कटपणें व्यक्त झालेलें असलें तरी त्याला संकुचितपणाचा स्पर्शहि झालेला नाही. बी. रघुनाथ यांचें सर्व जीवन ओढगस्तीचें गेलें. त्यामुळे मध्यमवर्ग आणि दलितवर्ग यांचें मोठें वास्तवतापूर्ण चित्रण त्यांच्या लेखणीने केलेलें आहे. आणि हें सर्व त्यांनी वयाच्या चाळिशीच्या आंत केलें ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे त्यांच्या लेखनकर्तृत्वाचें अत्यंत कौतुक वाटतें आणि त्यांच्या अकालमृत्युमुळे महाराष्ट्राची व मराठी वाङ्मयाची केवढी हानी झाली आहे याची थोडीफार कल्पना होते.

### प्रतिष्ठान

कांही गोष्टी नाहीशा होतात त्याप्रमाणे कांही गोष्टी नवीनहि निर्माण होतात. या नवीन निर्मितीतच मानवाचा आनंद साठलेला असतो, त्यांतच त्याच्या भवितव्याच्या आशा-आकांक्षांच्या खुणा उमटलेल्या असतात. याच दृष्टीने हैद्राबाद येथे मराठवाडा साहित्य परिषदे तर्फे गेल्या महिन्यापासून प्रसिद्ध होऊं लागलेल्या ' प्रतिष्ठान ' मासिकाचें आम्ही हार्दिक स्वागत करतों. आणि मराठवाडा सा. परिषदेचे धडाडीचे अध्यक्ष श्री. सेतुमाधवराव पगडी, कार्याध्यक्ष प्रा. माटेकर आणि संपादक डॉ. नांदापुरकर व त्यांचे सर्व सहकारी यांना या उपक्रमाबद्दल मनःपूर्वक धन्यवाद देतों. ' प्रतिष्ठान कार्यालय ' हें ' हैद्राबाद ' मध्ये उघडलें गेलें हा योग अत्यंत सूचक व महत्त्वाचा आहे. या मासिकामुळे मराठवाड्याच्या प्रादेशिक वाङ्मयीन गरजा निःसंशय पूर्ण होतील. मराठी भाषेच्या व वाङ्मयाच्या अभ्यासकांना नागपूर—हैद्राबादकडील प्रकाशनांची मुळीच माहिती नसते असें अनेकदा आढळून आलेलें आहे. मराठीचे भक्त आपल्या अभ्यासांतील ही उणीव नाहीशी करण्याचा यापुढे कसोशीने प्रयत्न करतील अशी आशा करावी काय ? आम्ही 'प्रतिष्ठान' ला उत्तरोत्तर उत्कर्ष चिंतितों.

# परिषद्-वार्ता

( चिटणीसांकडून )

**कै वा. म. जोशी स्मृतिदिनः**—कै. वा. म. जोशी यांच्या स्मृतिदिनीं ( २० जुलै ) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचें 'संशय, श्रद्धा व साक्षात्कार' या विषयावर विचारपरिप्लुत व्याख्यान झालें. त्यांच्या व्याख्यानाचें सार असें:—'श्रद्धा हा मानवी जीवनाचा गाभा आहे. साक्षात्कार आणि तार्किक बुद्धि यांच्या सान्निध्यांतून श्रद्धेचा विकास होतो. श्रद्धा तपासण्याचें प्रभावी साधन म्हणजे संशय. संशय हें न्यायमुख असून सिद्धांताचें पूर्व अंग आहे. संशयाच्या साहाय्याने आपण श्रद्धा पारखल्या नाहीत तर आपली प्रगति होणार नाही. साक्षात्कारांचीहि चिकित्सा करणें अत्यावश्यक आहे. साक्षात्कार म्हणजे प्रत्यक्ष ज्ञान.'

**प्रा. फाटक यांचें व्याख्यानः**—परिषदेच्या स्वाध्याय मंडळाचेवतीने दि. १६ ऑगस्ट रोजीं प्रा. न. र. फाटक यांचे 'वाङ्मयाचा अभ्यास' या विषयावर व्याख्यान झालें. वाङ्मयाचा अभ्यास करतांना कोणकोणत्या अडचणी येतात, त्यांचा परिहार कसा करावा, ग्रंथांमधील घटना व नोंदी पारखून कशा घ्याव्यात इत्यादि मुद्यांसंबंधी प्रा. फाटक यांनी व्याख्यानांत मार्गदर्शन केलें.

**कै. खाडिलकर स्मृतिदिनः**—२६ ऑगस्ट रोजीं नाट्याचार्य कै. काकासाहेब खाडिलकर यांचा स्मृतिदिन पाळण्यांत आला व यानिमित्त डॉ. के. ना. वाटवे यांचें 'रसविषयक कांही नव्या समस्या' या विषयावर व्याख्यान झालें. श्री. दि. के. बेडेकर यांनी 'नवभारत' मासिकांत रसविषयक जे नवीन विचार मांडले होते त्यांचाच डॉ. वाटवे यांनी सविस्तर व सुरसपणें परामर्श घेतला. डॉ. वाटवे यांचें व्याख्यान यादिवशीं न संपल्यामुळे श्रोत्यांच्या आग्रहाखातर त्यांनी दुसरें दिवशीं तें पुरें केलें.

**डॉ. शं. दा. पेंडसे यांचा सत्कारः**—ऑगस्टच्या अखेरीस 'कौशिक-व्याख्यान-माले' तर्फे पुण्याला डॉ. शं. दा. पेंडसे यांचीं ज्ञानेश्वरीवर चार व्याख्यानें झालीं व तीं अभ्यासकांना व सर्वसाधारण श्रोत्यांना फार उद्बोधक वाटलीं. डॉ. पेंडसे यांच्या या कार्याबद्दल व परिषदेशी त्यांचा असणारा ऋणानुबंध लक्षांत घेऊन दि. ३ सप्टेंबरला त्यांचा सत्कार करण्यांत आला. कार्याध्यक्ष प्रा. माटे, डॉ. पेंडसे व म. म. प्रा. द. वा. पोतदार यांचीं याप्रसंगीं भाषणें झालीं.

**श्री. वि. द. घाटे यांचा सत्कारः**— अहमदाबाद येथे भरणाऱ्या ३६ व्या साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष आमदार श्री. वि. द. घाटे यांचा दि. २६ सप्टेंबरला प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांच्या अध्यक्षतेखाली प्रकट सत्कार करण्यांत आला. प्रा. श्री. म. माटे, श्री. गोपीनाथ तळवलकर, डॉ. सरोजिनी बाबर, श्री. के. नारायण काळे, म. म. प्रा. द. वा. पोतदार व राजकवि यशवन्त यांनी सत्कारप्रसंगीं भाषणें केलीं. सत्कारानंतर श्री. घाटे यांचें भाषण झालें. 'मराठीचें दैन्य जाण्यासाठी संयुक्त महाराष्ट्र स्थापन झाला पाहिजे व त्याच्या स्थापनेसाठी सर्व महाराष्ट्रीयांनी अेकोप्याने वागलें पाहिजे' असे तळमळीचे विचार त्यांनी भाषणांत व्यक्त केले.

**वाङ्मयेतिहास योजनेची वाटचालः**— १६ ऑगस्ट रोजीं निर्वाहक मंडळ व कोषमंडळ यांच्या सभा झाल्या. प्रा. कृ. पां. कुलकर्णी, प्रा न. र. फाटक, सौ. कुसुमावती देशपांडे, श्री. वि. द. घाटे, प्रा. श्री. म. माटे, म. म. प्रा. द. वा. पोतदार हे सभासद उपस्थित होते. सभेंतील निर्णयानुसार वाङ्मयेतिहास योजनेचा आराखडा महाराष्ट्रांतील साहित्यसंस्था, प्रमुख नियतकालिकें व तज्ज्ञ यांच्याकडे विचारार्थ पाठविण्यांत आला. आराखड्यावरील सूचना मागविण्याची मुदत १० आक्टोबरपर्यंत दिली आहे. येणाऱ्या सूचनांचा पुढील सभेंत विचार होईल व पुढील कार्याची दिशा ठरेल.

**संमेलनः**— ३६ वें महाराष्ट्र साहित्य संमेलन 'महाराष्ट्र समाज' या संस्थेतर्फे अहमदाबाद येथे ३१ आक्टोबर व १–२ नोव्हेंबर रोजीं श्री. वि. द. घाटे यांच्या अध्यक्षतेखालीं भरणार आहे. संमेलनाचें अुद्घाटन लोकसभेचे अध्यक्ष ना. श्री. दादासाहेब मावळंकर हे करतील. संमेलनप्रसंगीं संतवाङ्मयविषयक शाखासंमेलन भरणार असून अितरहि बरेच अुद्बोधक कार्यक्रम योजिले आहेत.

**अभिनंदनः**—परिषदेचे सभासद प्रा. वि म. कुलकर्णी व प्रा. दु. का. संत यांना मुंबई विद्यापीठानें पीएच्. डी. पदवी दिली. त्यांच्या वाङ्मयाभ्यासाच्या या मान्यतेबद्दल परिषद् त्यांचें अंतःकरणपूर्वक अभिनंदन करीत आहे.

---

# साभार-स्वीकार

१. महाराष्ट्रीय संतवाङ्मय व जीवन-( व्याख्यानसंग्रह ) मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, दादर; ४ रु.

२. गणपुले कुलवृत्तांत—सं. प. व. गणपुले, सयाजीगंज, बडोदे.

३. सचित्र बालमनोरंजन—के. व. जोशी, सौ. मैत्रेयी विनोद, ट्रे. कॉ. फॉर वुमेन, पुणें १; ।-

४. थिऑसफींत नवीन काय आहे ?—वा. ल. चिपळूणकर-रा. स. भागवत, मराठी थिऑ. फेडरेशन, पुणें ४; ।.

५. आधुनिक मराठी कविता—भ. श्री. पंडित, सुविचार प्रकाशन मंडळ, लि नागपूर १; ५ रु.

६. प्राकृत समश्लोकी ( गीतगोविंद )—प. बा. क्षीरसागर, श्रीनारायणश्रम, ३९९ गणेश, पुणें २; ३ रु.

७. सुनांनो स्वयं उद्धरा आपणांसी ( काव्य )—रमातनय, अनंताचार्य आद्य आगरखेड; ३। रु.

८. मी आणि माझें वक्तृत्व (खंड १) सं.-प्रका.-अ. वि. पाटणकर, २०५ खेतवाडी मेनरोड, मुंबई ४; ३॥ रु

९. जान्हवी ( कादं. )—वि. वा. शिरवाडकर, देशमुख आणि कं. पुणें २; ३॥ रु.

१०. स्वप्नांतरिता ( कादं. )—ग. त्र्यं. माडखोलकर, देशमुख आणि कं. पुणें २; ५रु.

११. किनारा ( कविता )—कुसुमाग्रज, देशमुख आणि कं. पुणें २; ३॥ रु.

१२. जाओ (कादं.)-विभावरी शिरूरकर, देशमुख आणि कं. पुणें २; ३॥ रु.

१३. प्रीतीचा शोध ( कथा )—वि. स. खांडेकर, देशमुख आणि कं. पुणें २; ५ रु.

१४. तांबे यांची समग्र कविता (६ वी आवृत्ति ) सं-रा. श्री. जोग, व्हीनस बुक स्टॉल, पुणें २, ५ रु.

१५. विराटपर्व ( मुक्तेश्वरकृत )—सं. द. सी. पंगु, व्हीनस बुक स्टॉल, पुणें २, ६ रु.

१६. मराठी कादंबरी ( भाग १ )—कुसुमावती देशपांडे, मुंबई मराठी साहित्य संघ, मुंबई ४, ३॥ रु.

१७. श्रीविठ्ठल आणि पंढरपूर (दु.आ.) ग. ह. खरे, क्यूरेटर भा. इ. सं. मंडळ, पुणें २. १ रु.

१८. शिवचरित्र-संशोधन-वृत्त राजशक २७९, ग. ह. खरे, क्यूरेटर भा. इ. सं. मंडळ, पुणें २. ४ आ.

१९. फुरसतीचे क्षण—द. मो. दामले वक्षी वाडा, किल्ल्याजवळ सोलापूर, २ रु.

२०. वच्छहरण ( पं. दामोदरकवि विरचित ) सं. द. सी. पंगु, रामकृष्ण बुक डेपो, गिरगांव मुंबई ४. ४ रु.

२१. श्रीरामामृत तरंग ( रामपंडितकृत ) सं. गो. नागराजराव, एस्. गोपालन, चिटणीस, कार्यवाहमंडली, सरस्वतीमहाल ग्रंथालय, तंजावर. ३॥ रु.

# नवीन सभासद

## तहह्यात

१ प्रा. सौ. तारा नारायण घुमटकर पुणें २. रु. १०१.

## साधारण

१ श्री. सदाशिव शंकर माळी, पुणें २.
२ सौ. मधुमालती कुलकर्णी, सांगली.
३ कु. प्रभावती कन्नल, सांगली.
४ श्री. रामचंद्र कृष्णाजी सबनीस, कोल्हापूर.
५ कु. चंद्रप्रभा तोडकर, नागपूर २.
६ श्री. विष्णु रामचंद्र देशपांडे, पुणें २.
७ श्री. विश्वनाथ गोविंद जोशी, पुणें २.
८ श्री. विश्वनाथ गंगाधर मोघे, पुणें २.
९ श्री. श्रीरामशास्त्री विष्णुशास्त्री शेलगांवकर, जालना, (निजाम).
१० श्री. हेडमास्तर, विद्यामंदिर, निपाणी (बेळगांव).
११ श्री. मुख्याध्यापक, सर्वोदय मा. विद्यालय, उंबरखेडे (पू. खा.)
१२ श्री. शंकर नारायण सहस्त्रबुद्धे, अमरावती (विदर्भ).
१३ श्री. दत्तात्रय बाळकृष्ण कालेलकर, नवी दिल्ली.
१४ श्री. डेविडकुमार कांदळेकर, मुंबई ८.
१५ श्री. सुधाकर गोपाळ बापट, शेवगांव, (अहमदनगर).
१६ श्री. माधवराव यादवराव कुरुंदकर, अंबेजोगाई (द. हैद्राबाद).
१७ श्री. ज्ञानेश्वर माधवराव खोडसकर, अंबेजोगाई (द. हैद्राबाद).
१८ श्री. साधु उमाजी भारजकर, अंबेजोगाई (द. हैद्राबाद).
१९ श्री. प्रभाकर गोपाळराव भावठाणकर, अंबेजोगाई (द. हैद्राबाद).
२० श्री. त्र्यंबक सांबराव वसेकर, अंबेजोगाई. (द. हैद्राबाद).
२१ श्री. गजानन भगवानराव वैद्य, अंबेजोगाई (द. हैद्राबाद).
२२ श्री. ज. के. रानडे, सातारा.
२३ श्री. गोविंद श्रीनिवास कुलकर्णी, तासगांव (द. सातारा)
२४ श्री. सिंधु रेगे, किर्लोस्करवाडी (द. सातारा)
२५ श्री. जी. के. माने, खानापूर (द. सातारा)
२६ श्री. प्र. ल. गावडे, पुणें २.
२७ सौ. सुमना जी. झाडबुके, पुणें २.
२८ श्री. जयंत रंगनाथ लळित, सोलापूर.
२९ श्री. गोविंद वामन आपटे, तासगांव (द. सातारा)

---

## नवीन सभासद

साधारण

१. श्री. प्रभाकर पाटील, बीड (मराठवाडा)
२. श्री. आत्माराम गो. डाकवे, चिपळूण (रत्नागिरी)
३. श्री. शालिनी कृष्णराव कामत, सोलापूर
४. श्री. मा. चि. टेंभेकर, सोलापूर
५. श्री. मा. के. आपटे, सोलापूर
६. श्री. म. कृ. देशपांडे, कल्याण (ठाणें)
७. श्री. मुरलीधर द्वारकानाथ वठावकर (ठाणें)
८. श्री. विजया शामराव पुणेकर, पुणें २
९. प्रा. सुरेश गोविंद खांडेकर, भिंदूर
१०. श्री. ना. वा. जोशी, अहमदाबाद
११. श्री. वि. कृ. मंगरूळकर, सोलापूर
१२. श्री. केशरीचंद जिवराज शहा, सोलापूर
१३. श्री. निर्मलकुमार जिनदास फडकुले, सोलापूर
१४. श्री. अ. वि. माटोडकर, भोकर (जि. नांदेड)
१५. श्री. नरहर गणेश कानेटकर, अहमदबाद ८
१६. श्री. तु. ना. काटकर, चांदा (मध्यप्रदेश)
१७. श्री. गो. बा. पुळीवार, चांदा (मध्यप्रदेश)

मुद्रक :—म. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, लि०, १९८/१७, सदाशिव, पुणें २.
प्रकाशकः—अ. गं. मंगरूळकर, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.